ललित साहित्य प्रकाशन ४३ वें

# तेथें चल राणी!

(' THE CHIPS ARE DOWN ' या कादंबरीचा अनुवाद )

लेखक

**जियाँ पॉल सार्त्र**

अनुवादक :

**प्रा. वसंत कानेटकर, एम्. ए.**

**१५ ऑगस्ट १९५४**

प्रथमावृत्ति

**किंमत अडीच रुपये**

प्रकाशक
पंडित अनंत कुलकर्णी
कुलकर्णी ग्रंथागार
१८६ शनवार, पुणें २.

मुखपृष्ठ
चित्रकार मुळगांवकर

प्रकाशन ९५ वें

मुद्रक
शंकर रामचंद्र दाते
यशवंत छापखाना
२०० सदाशिव, पुणें २.

प्रा. राजा पाटणकर

आणि

सौ. लीला पाटणकर

यांच्या प्रेमळ स्नेहशीलतेस--

# निवेदन



'घर' आणि 'पंख' नंतर मराठी वाचकांना मी 'तेथें चल राणी' ही तिसरी कादंबरी सादर करीत आहे. या कादंबरीत मी निमित्तमात्रच आहे. 'बोलविता धनी' वेगळाच आहे. विख्यात फ्रेंच तत्त्वज्ञ आणि कथाकार जियाँ पॉल सार्त्र यांच्या '*Lex Qeux Sont Faits*' या फ्रेंच सिनेरिओचा *Louise Varese* यानी *The Chips Are Down* या कादंबरीत इंग्लिश अनुवाद १९५१ साली प्रसिद्ध केला. *The Chips Are Down* या कादंबरीचा 'तेथें चल राणी' हा मराठी अनुवाद आहे. या अनुवादांत भारवाहकाचें मीं स्वीकारलेलें काम नीटपणें पार पडलें आहे किंवा नाहीं त्याचा निर्णय रसिकांनीच द्यावयाचा आहे. माझ्या स्वतःच्या 'घर' आणि 'पंख' या कादंबरींतील आशयापासून निवेदनपद्धतीपर्यंत साऱ्याच बाबतीत मी व्यक्तिशः जबाबदार होतों. त्याबद्दल मराठींतील जाणत्या टीकाकारांनी मला भरपूर पारितोषिक (आणि प्रायश्चित्तहि–) दिलेलें आहे. या सर्व टीकाकारांचा मी मनःपूर्वक आभारी आहें.

प्रस्तुत कादबरीचा मराठी अनुवाद वाचकांना सादर करतांना त्यांतील निवेदनाच्या अंगापुरतेंच मला जबाबदार धरणें योग्य होईल. अर्थाची हानि होऊं न देतां, रसग्राही दृष्टींतून क्वचित थोडे फेरफार करून, मीं हा अनुवाद मूळ लेखकाच्या कृतीशीं शक्य तितका मिळता जुळता ठेवण्याची पराकाष्ठा केली आहे. या कादंबरीतील आशय मला व्यक्तिशः प्रिय आणि जिव्हाळ्याचा वाटतो; त्यामुळं या आशयाचें प्रमुख स्वरूप स्पष्ट करणें, रसिकांना कादंबरीचीं बलस्थानें उमजण्याच्या दृष्टीनें, आवश्यक आहे असें मला वाटतें. म्हणून या प्रदीर्घ प्रस्तावनेचा हा प्रपंच मी करीत आहे.

अद्भुतरम्य घटनांची रेलचेल आणि नर्मविनोदी वातावरण हें या कादंबरीचें वरचें कवच आहे–ही वस्तुस्थिती ही कादंबरी वाचणाऱ्या कोणाहि रसिकाच्या सहज लक्षांत येईल. या कवचाखाली मानवी जीवनांतील एक करुण कहाणी लपलेली आहे. 'तेथें चल राणी' ही एका राजकीय क्रांतिकारकाची विफल प्रेमकथा आहे, एवढें म्हटल्यानेच तिचें सामर्थ्य प्रकट होणार नाही. कारण या कादंबरीत (– मराठीतील अनेक नामांकित कादंबरीकाराच्या कादंबरीप्रमाणे) 'प्रणय विरुद्ध राजकीय क्रांति' अशी समस्या मांडल्यासारखी दिसत असली तरी, पानापानावर क्रांतीचे रंगीबेरंगी झेंडे मिरवणारा, दलिताच्या रक्ताचे आणि स्वतःच्या सर्वस्वाच्या यज्ञयागाचे कोडकौतुक करणारा, आणि फावल्या वेळात प्रणयाच्या त्रिकोणांत साक्षेपानें रिंगण घालणारा कथानायक (––मराठी वाचक अशा नायकाला अलीकडे चांगलेच ओळखू लागले आहेत!) या कथेत लेखकाने चित्रित केलेला नाही. या कहाणीचा वरवर अर्थ लावणाराना या कथेत प्रणयाचे गोडवे लेखकाने गायल्यासारखे वाटतील, आणि तेंहि क्रांतिवादासारख्या सामाजिक मूल्याची सारी भूषणे हिरावून घेऊन लेखकाने प्रीतीसारख्या व्यक्तिनिष्ठ मूल्याचे स्तोम माजविलें आहे असेंहि भासण्याचा संभव आहे. 'क्रांति' या समुदायवाचक शब्दाचे जगभर देव्हारे माजत असतांना (–आणि कोणत्याहि सामुदायिक चळवळीसाठी प्रणयाचा आणि क्वचित प्राणाचा, त्याग करणाऱ्या नायक–नायिकाची कथाकादंबऱ्यातून दैवतें बनविण्यात येत असताना–) सार्त्रसारखा एखादा कथाकार प्रणयपथावर पराजित झालेल्या प्रेमिकाची कथा जिव्हाळ्याने सांगू लागताच, त्याची प्रेषित म्हणून नव्हे, तर प्रतिगामी प्रवृत्तीचा लेखक म्हणूनच आजच्या जमान्यांत संभावना होण्याचा अधिकच संभव आहे. कारण क्रांतीचा संबंध 'समुदायाच्या सुखाशी' तर प्रीतीचा संबंध दोन व्यक्तींच्या चैनीशी निगडित करण्याची आपल्याकडील विचारवंताची परंपरा कांहीं नवीन नाही. विषय देवकारणाचा असो वा देशकारणाचा असो, "स्त्री ऐसी लाघवाची बेडी। दुरी राखिता हेंचि बरें ...." या भूमिकेपासून प्राचीन संतकवीप्रमाणें आधुनिक क्रांतिकवीहि सहसा ढळलेले दिसत नाहीत.

म्हणूनच या कादंबरींत व्यक्त झालेल्या आशयावर लोकवाङमयाचा पुरस्कार करणारे कांही टीकाकार, नाक मुरडून ' व्यक्तिवादी ' असा छाप मारून टाकण्यास कचरणार नाहीत, याची मला खात्री वाटते. सोयीस्कर असे कोणतेहि गैरसमज करून घेण्यास लोकवाङमयाचे हे मानकरी स्वतंत्र आहेत. एरवीं खरा ' व्यक्तिवाद ' हा आत्मनिष्ठेपेक्षा आत्मशोधनाला आणि आत्मगौरवापेक्षा आत्मविकासाला अधिक जवळ आहे. हें काय मुद्दाम साक्षीपुराव्याने सिद्ध करायला हवें का ? म्हणून रसिकानी या झापड लावलल्या दृष्टिकोनापेक्षा अधिक सजीव, लवचिक भूमिकेनें या कहाणीकडे पहावे अशी माझी त्याना नम्र विनति आहे.

जियाँ पॉल सार्त्र, हे नुसते प्रतिभाशाली कादबरीकार म्हणून प्रसिद्ध नाहीत, तर विचारवताच्या विश्वात खळबळ उडविणाऱ्या अस्तित्ववादी (*Existentialist*) तत्वज्ञानाच्या परपरेतील एक ख्यातनाम तत्त्वज्ञ आहेत. या कादबरीची मीमासा करतांना म्हणूनच केवळ ललितलेखनातील मत्रनत्राचा विचार केल्याने तिचें सामर्थ्य प्रकट होणार नाही. ही कादबरी म्हणजे एक तत्त्वज्ञ कलावताच्या मनाचा प्रतिभाशाली उद्गार आहे. अशा उद्गारात कलावताचा जीवनविषयक दृष्टिकोन आणि त्याचे तत्वज्ञान प्रतिबिबित होणें अपरिहार्य आहे. मराठी वाचकांना या कादबरीचे स्वारस्य उमजण्यासाठींच मूळ लेखकाच्या तत्त्वज्ञानाचें आवश्यक तेवढें रगरूप न्याहाळणें अगत्याचें आहे.

* ' अस्तित्ववाद ' (*Existentialism*) हा शब्द नवा असला, तरी त्यामागील विचारसरणी बरीच जुनी आहे. तिचा आविष्कार सार्त्र या लेखकाप्रमाणेच नित्शे, हेडेगार, कर्कगार्ड, जेस्पर्स, गेब्रीयल मार्शल इत्यादि अनेक विचारवतांनी स्वतत्रपणे केलेला आहे. सारेच अस्तित्ववादी विचारवत वैचारिकेच्या एकाच चौकटीत बसतात असेहि नाही. त्यातहि जेस्पर्स,

* अस्तित्ववादाविषयी सविस्तर माहितीसाठी जिज्ञासूनी पुढील ग्रंथ वाचावेत :–

1) *Existentialism and Humanism– J. P. Sartre.*

2) *Existentialism– a Critique–Marjorie Greene.*

गेब्रीयल मार्शलसारखे ईश्वरवादी आणि हेडेगार आणि स्वत: सार्त्र यांसारखे निरीश्वरवादी असे पथ–प्रणेते आहेत. अस्तित्ववाद, हा जीवनाकडे पाहण्याचा एक वैशिष्टयपूर्ण दृष्टिकोन आहे. या परंपरेंतील तत्त्ववेत्त्यांनीं मानवी जीवनाबद्दल काही मूलभूत प्रश्न उपस्थित केले आहेत, आणि कांही महत्त्वाचे स्वतंत्र सिद्धात प्रतिपादिले आहेत. त्या सर्वांचा येथें साकल्यानें आणि साक्षेपानें विचार करणें अशक्य आहे. प्रस्तुत कादंबरीतील मर्मस्थाने स्पष्ट होण्याच्या दृष्टीनें जरूर तेवढयाच प्रमुख विचारांचा निर्देश या ठिकाणी अभिप्रेत आहे.

अस्तित्ववादाच्या तत्त्वज्ञानाबद्दल 'समजा'पेक्षां गैरसमजच सर्वत्र पसरले आहेत, अशी स्वत: सार्त्र यानीं तक्रार केली आहे. कोणाला त्यांत निष्क्रियता, तर कोणास अश्रद्धा दिसते. कोणी त्यावर पाखंडी तर कोणी अमंगल–असुदरवादी असा आरोप करतात. कोणाला त्यांत नीतिविरुद्ध बंड आढळतें, तर कोणाला हा साराच एक तऱ्हेवाईकपणा भासतो. एक नवीन टूम, म्हणूनहि त्याकडे अनेकदां उपहासानें पाहिलें जातें. असें हें अस्तित्ववादी तत्त्वज्ञान आहे तरी काय ?

अनेक तत्त्ववेत्त्यांप्रमाणें अस्तित्ववादी सार्त्र हेहि ' मानवी जीवनाचा हेतु कोणता ? ' आणि ' मानवी जीवनाचें साफल्य कशांत आहे ? ' या प्रश्नाच्या गाभ्याला हात घालतात. या प्रश्नांचीं उत्तरें ' व्यक्तीच्या अधिष्ठानावरून ' ( Begin from the subjective,... ) देण्याचा ते प्रयत्न करतात. कारण त्यांच्या मतें, समाज ही एक अमूर्त कल्पना आहे, तर व्यक्ति ही त्यांतील वस्तुस्थिति आहे. म्हणून हे प्रश्न प्रामुख्यानें व्यक्ति-जीवनांत उपस्थित होतात, आणि व्यक्तिजीवनाच्या पातळीवरूनच त्यांचीं उत्तरें देणे क्रमप्राप्त होतें. सार्त्र ईश्वराचें अस्तितत्व मानीत नाहींत. त्यामुळेंच मानवी जीवनास पूर्वसिद्ध असा कांहीं एक हेतु आहे, ही विचारसरणी त्यांना अमान्य आहे. जन्माला आलेल्या प्रत्येक माणसाला जन्म आणि मृत्यु या वस्तुस्थिति अटळ आहेत. त्या बरोबरच क्षुधा, तृषा, निवारा इ० उपाधि देखील मानवास जन्मत:च जडलेल्या आहेत. यालाच ते *Human Universality of Condition* असें संबोधतात, आणि या वस्तुस्थिति आणि उपाधि

पेक्षां मानवाचें ' मानवपण ' वेगळें आहे असें ते सांगतात. या ' मानवपणाला ' वा ' मानवतेलाच ' *Essence* ' असें संबोधून अस्तित्ववादाविषयी एक अत्यंत महत्त्वाचें सूत्र ते असें सांगतात कीं *Existence is prior to essence*. अर्थ असा कीं मनुष्यप्राणी जन्माला येतो अगोदर, आणि मग त्याचा जगण्याच्या आणि जगतां जगतां जीवनाला आकार देण्याच्या धडपडींतून, त्याचें 'मानवपण' प्रकट होऊं लागतें. या सूत्रांतील आशय स्पष्ट करण्यासाठीं सार्त्र यांनीं एका सुरीचें उदाहरण घेतलें आहे. सुरी तयार करणाऱ्या मानवाच्या मनांत आधीं तिचा उपयोग आणि तिचें रंगरूप याबद्दल स्पष्ट कल्पना उभी असते. किंबहुना अशी स्पष्ट कल्पना मनामध्यें सिद्ध झाल्यावरच सुरी अस्तित्वांत येऊं शकते. अन्न, वस्त्र, निवाऱ्यासाठीं अनेक प्रकारच्या उत्पादनांत मानव जो गढून गेलेला दिसतो, त्यापैकीं प्रत्येक उत्पाद्य वस्तूबद्दल असेंच म्हणतां येईल. आधी त्या वस्तूबद्दल कल्पना आणि मग तिचें अस्तित्व. इथें *Essence* आधीं, आणि *Existence* नंतर, अशी वस्तुस्थिति आढळते. पण खुद्द मानवाच्या अस्तित्वाविषयीं असें म्हणतां येईल का ? मानवाच्या जीवनाच्या हेतूबद्दल आणि साफल्याबद्दल, मानवप्राणी अस्तित्वांत येण्यापूर्वी अशी कल्पना करणार तरी कोण? जीवन जगणारा मानव आणि आपल्या जगण्याला बरावाईट अर्थ देणारा–तोहि मानवच म्हणून सार्त्र म्हणतात...... " If god dose not exist, there is at least one being, whose existence comes before its essence; a being which exists before it can be defined by any conception of it. That being is MAN..." यालाच हेडेगार 'Human reality' असें नांव देतो.

असा हा मानव कांहीं स्वयंभूपणें आकाशांतून एकाकी पडत नाही. विशिष्ट समाजांत, विशिष्ट कुटुबांत, विशिष्ट स्थलकाली जन्म घेतल्यानें प्रत्येक माणसाच्या सभोंवतालीं खास त्याची म्हणून एक परिस्थिति ( *Situation* ) निर्माण झालेली असते. ही प्राप्तपरिस्थिति, माणसामाणसांचा विचार करतांना ठोकळमानानें एकसारखी दिसत असली, तरी एका विशिष्ट थरांतील एका माणसाचे प्रश्न, हे दुसऱ्या त्याच थरांतील

अन्य कोणाहि माणसाचे प्रश्न होऊं शकत नाहीत. त्यांत वरकरणी सारखेपणा दिसला तरी तो उपरा असतो. प्रत्येक व्यक्तीची परिस्थिति आणि त्या व्यक्तीनें केलेली प्रतिक्रिया ही दुसऱ्या कोणत्याहि व्यक्तीच्या परिस्थितीशीं आणि प्रतिक्रियेशी कधीहि जुळणारी आढळणार नाही. यामुळेंच सामाजिक जीवनाच्या कोलाहलातहि प्रत्येक व्यक्तीचा जीवनमार्ग एकाकी ( *Forlorn* ) आहे असे अस्तित्ववादी मानतात.

व्यक्तिजीवन आणि प्राप्तपरिस्थिति यांच्या या वैचित्र्यपूर्ण वस्तुस्थितीमुळे कांही ठोकळ पूर्वसिद्ध आदर्शवादी मूल्याच्या कसावर व्यक्तिजीवनाचें मूल्यमापन करणे, आणि त्यावरून मानवी जीवनाचा हेतु आणि साफल्य ठरविणे, याला अर्थातच अस्तित्ववादी विचारवंतांचा पूर्ण विरोध आहे. कारण या विश्वात मानवाचा अवतार घडण्यापूर्वी सिद्ध झालेले असे कोणतेहि निकष वा कोणतीहि मूल्यें नाहीत. प्रत्येक व्यक्ति आपल्या जीवनाच्या एका मर्यादित परिस्थितीने बद्ध अशा जगात वावरत असली, तरी या प्राप्तपरिस्थितीतहि जीवनाचे अनेक मार्ग प्रत्येक व्यक्तीला प्रतिक्षणी आवाहन करीत असतात. या अनेक जीवनमार्गापैकी कोणत्या तरी एका जीवन मार्गाची निवड करणें प्रत्येक व्यक्तीला भाग पडते. गुलामाला देखील निमूटपणें सत्तेपुढें मान तुकविणे, सहकाऱ्यांसह बंड पुकारणें, पळून जाऊन स्वत:च बचाव करणें असे अनेक मार्ग त्याच्या जीवनाच्या कक्षेंत खुणावीत असतात. यापैकी कोणत्याहि एका जीवनमार्गाची निवड करण्यास व्यक्ति स्वतंत्र आहे; पण म्हणूनच मग स्वत: निवडलेल्या जीवनमार्गाबद्दल व्यक्ति संपूर्ण जबाबदार आहे–असें सार्त्र प्रतिपादतात. मानवाला लाभलेल्या या विचित्र स्वातंत्र्याचे आणि त्याच्या ललाटी लादलेल्या या विक्षिप्त जबाबदारीचे स्वरूप विशद करतांना सार्त्र म्हणतात– ' Man is condemned to be free. Condemned–because, he did not create himself, yet is nevertheless, at liberty and from the moment that he is thrown into this world, he is responsible for everything he does. आपला जीवनमार्ग निवडतांना प्रत्येक व्यक्तीची जाणीवशीलता ( Conscionsness ) कसाला लागते. या जाणीवशीलतेंत प्रामुख्यानें,

आपल्या परिस्थितीबद्दलचें पूर्ण निदान, स्वतःचीं बलस्थानें आणि मर्यादा यांचें पूर्ण आकलन, या बाबींचा अन्तर्भाव होतो. आपल्या जीवनमार्गाची निवड करतांना प्रत्येक व्यक्तीला इतिहासांतील अनुभवांचा आधार घेतां येईल. पण त्यांनाहि निर्विवाद मार्गदर्शनाची हमी नाहीं. तें काम ज्याचें त्यानें स्वतःच करावयाचे आहे. मानवी जीवनाबद्दल पूर्वसिद्ध अशी कोणतीहि नैतिक समीकरणें (Ethic formulae) उपलब्ध नाहीत– या वस्तुस्थितीलाच सार्त्र 'Abandonment' अशी संज्ञा देतात आणि ..that is what 'abandonment' implies, that we ourselves decide our being. .You are free, therefore choose–that is to say *invent* . " जीवनमार्गाची निवड करणें म्हणजे ' **नवी वाट निर्माण**' करणें. जीवनप्रेरणेत अमर्याद आणि अनंत आकाराची शक्यता सुप्त असते. जन्माला आलेली प्रत्येक व्यक्ति आपल्या जगण्यानें त्यांतील एक एक आकार सिद्ध करीत असते. मानवी जीवनाचें स्वातंत्र्य आणि मानवानें निर्माण केलेली नियमावलि याचे परस्पर संबंध सूचित करतांना सार्त्र यांनी प्रतिभाशाली चित्रकाराचें उदाहरण घेतलें आहे ते विचारतात कीं– प्रतिभासंपन्न चित्रकारानें चित्रें कोणती काढावीत ? कशी काढावीत ? रंगरेखेच्या संयोजनेत कोणकोणते नियम पाळावेत ? याबद्दल काही पूर्वसिद्ध ठाम सिद्धांत सांगता येतील का ? प्रत्येक प्रतिभाशाली कलावंत या सर्व बाबतीत स्वतंत्र आणि स्वयंप्रज्ञ असतो, नव्हे काय ? ठोकळेबाज नियमावलींपेक्षां स्वतःच्या अन्त प्रेरणेला ' वाट पुसत ' त्याची प्रतिभा ' नव्या सृष्टी'ची निर्मिति करीत नाही का ? मानवी जीवनांतील नीतितत्त्वाचें आणि हरएक प्रकारच्या धरबंधाचेंहि असेंच आहे, असे अस्तित्ववादी मानतात. प्रत्येक व्यक्तीच्या जीवनशोधातून ( *Exploration*) मानवी जीवन व्यक्त होतें. म्हणूनच जीवनमार्गाची निवड आणि निर्मिति या बाबत ' व्यक्तिधर्म ' हीच अंतिम कसोटी मानावी लागते.

जिचा मानवाच्या जन्माशीच संबंध आहे अशा प्राप्तपरिस्थितीला माणूस जबाबदार नसला, तरी परिस्थितीवर मात करण्यासाठी वा तिला आकार देण्यासाठी निवडलेल्या जीवनमार्गाबद्दल, तो व्यक्तिशः जबाबदार

असतो. कारण अशा जीवनमार्गांतून माणूस स्वतःचें, आणि म्हणून पर्यायानें सबंध मानवजातीचें जीवन अर्थपूर्ण आणि सफल करण्याची धडपड करीत असतो. प्रत्येक व्यक्तीनें आपल्या जीवनमार्गाची केलेली निवड, म्हणजे प्राप्तपरिस्थितीशीं केलेली कांहीं 'खाजगी तडजोड' नव्हे. म्हणूनच 'मी स्वतः कसाहि जगलों आणि वागलों, तरी इतरांना त्याच्याशीं करावयाचें आहे काय?' असा बेजबाबदार प्रश्न करण्याचा कोणालाहि अधिकार पोंचत नाहीं. प्रत्येक व्यक्ति आपला जीवनमार्ग चोखाळीत असतांना पर्यायानें मानवी जीवनाचा एक प्रकार (*Way of Life*) सिद्ध करीत असते; आणि कमीअधिक प्रमाणांत त्याचा अन्य व्यक्तींच्या जीवन-मार्गावर परिणाम होत असतो. राम, कृष्ण, भीष्म, कर्ण, बुद्ध, ख्रिस्त, चंगीजखान, सिकंदर, गाधीजी, हिटलर इत्यादि विभूतींनीं आपआपल्या जीवनमार्गाची निवड करून मानवी जीवनाचे विविध आकार सिद्ध केले आहेत. म्हणून आपल्या जीवनमार्गाची निवड करतांना व्यक्ति स्वतंत्र असली तरी बेजबाबदार राहूं शकत नाही. सार्त्रं म्हणतात.."When we say that man chooses himself, we do mean that every one of us **must choose himself** but by that, we also mean that, in choosing for himself he chooses for all men ... In fashioning myself, I fashion MAN..."

व्यक्तिमनांतील ही 'जबाबदारीची जाणीव' सार्त्रं Anguish या शब्दानें व्यक्त करतात. निवड करण्याची ही जबाबदारी टाळणारीं माणसें अगतिक आणि प्रवाहपतित होतात; आणि अशा प्रवाहपतितांचें जिणें, असून नसल्यासारखें किंवा विफल होतें–असें अस्तित्ववादी मानतात. जीवनाच्या संघर्षात प्रवाहपतित होणें, ही एक माणसानेंच शोधलेली पळवाट आहे. या पळवाटेनें पळणारा माणूस आपल्या अयशस्वी जीवनाचें खापर केवळ प्राप्तपरिस्थितीवर फोडू पाहात असतो. केवळ परिस्थितीला दोष देऊन स्वतःच्या निष्क्रियतेचें समर्थन करणारीं माणसें आत्मवंचक आणि अप्रामाणिक असतात, असे अस्तित्ववादी ठामपणें सांगतात. सार्त्रं म्हणतात "..The existentialist says that the coward makes him-

self cowardly, the hero makes himself heroic; and there is always a possibility for the coward to give up cowardice and the hero to stop being heroic . . ."

प्रारब्धाकडे बोट दाखवून 'ठेविलें तैसेचि' राहण्यानें नव्हे, तर 'कर्मवादा'वर आणि स्वतःच्या कर्तृत्वावर माणूस आपली 'मानवता' प्रकट करतो, हाच या मीमांसेचा निष्कर्ष आहे. 'कर्मवादांत' आणि 'कर्तृत्वांत' स्वतःच्या व्यक्तिधर्माचा शोध आणि कोणत्याना कोणत्यातरी 'ध्येया'वर अविचल श्रद्धा, या दोन वृत्ति अपरिहार्यपणे व्यक्त होतात. त्यास उद्देशून सार्त्र म्हणतात, "..It is not by turning back upon himself, but by seeking beyond himself an aim, which is one of liberation, or of some particular realization that man can realise himself as truly Human . . ."

अशा रीतीनें स्वतःच्या जीवनमार्गाची नुसती निवड केल्यानें माणसाची जबाबदारी संपली असें नाहीं. उलट या जबाबदारीला इथें आरंभ होतो. प्रेमिकानें प्रेम करण्याचा वा देशभक्तानें देशसेवेला वाहून घेण्याचा, नुसता संकल्प सोडण्यानें, त्यांचें अस्तित्व सिद्ध होऊं शकत नाही. संकल्पाला कृतीची जोड देण्यानेंच मानवाच्या व्यक्तित्वाला आकार येतो आणि जीवनमार्ग स्पष्ट होतो. सार्त्र म्हणतात–" There is no reality except in action. Man is nothing else but what he purposes; he exists only in so far as he realises himself in action; he is therefore nothing else but the sum of actions. . . ."

जीवनमार्गाची निवड आणि त्या नुसार प्रत्यक्ष कृति यांना प्रत्यक्षांत श्रेयसिद्धि लाभेलच असें नाहीं. प्रत्येक संकल्प यशस्वी होतो असें नाहीं–किंबहुना क्वचितच यशस्वी होतो. हातीं घेतलेल्या कृतीत निर्विवाद यशप्राप्ति झालीच पाहिजे, असें कोण सांगू शकेल ? यशःसिद्धि ही पुष्कळशी योगायोगावर आणि बरीचशी व्यक्तीच्या आवांक्यापलीकडील अशा घटनांवर अवलंबून असते. म्हणूनच कोणत्याहि कृतीचें मूल्यमापन प्रत्यक्ष यशापेक्षां, व्यक्तीनें प्रयत्नाचें भरमाप टाकलें आहे किंवा नाहीं यावरूनच केलें पाहिजे.

अस्तित्वादी विचारवंत निर्धारानें असें सांगतात कीं कोणत्याहि प्रकारच्या कृतीला, यशाच्या हमीची प्रेरणा लागतेच असें नाहीं. " One need not hope in order to undertake one's work......We should act without hope......" या शब्दांत अस्तित्ववादी सार्त्र जणू श्रीमद्‌भगवद्‌गीतेतील ' निष्काम कर्मयोगा 'च्या सिद्धांताचाच पुरस्कार करीत आहेत असें वाटतें. (श्रीमद्‌भगवद्‌गीतेत व्यक्त झालेलें तत्त्वज्ञान अनेक बाबतीत अस्तित्ववादी वैचारिकेशीं जुळणारे आढळतें. जिज्ञासू रसिकांना ही मीमांसा मनोरंजक आणि उद्‌बोधक वाटली तरी, प्रस्तुत प्रस्तावनेच्या संदर्भात, अप्रस्तुत म्हणून केवळ निर्देश करून बाजूला ठेवावी लागत आहे.) कृति करण्यासाठीं मानवाला यशाची लालूच लागतेच असे नाही. कारण ' कर्मरत ' असणें ही मानवी जीवनाची एक सहज प्रेरणा आहे. स्वतः निवडलेल्या जीवनमार्गावरून अनंत प्रकारच्या हालअपेष्टा सहन करीत वाटचाल करीत राहणे; प्रसंगी स्वत.च्या प्राप्त परिस्थितीशी मुकाबला करीत, तर प्रसंगी स्वत.च्या मर्यादांवर मात करीत आपलें व्यक्तित्व सिद्ध करण्यासाठीं धडपडणे—ही मानवाची एक प्रबल इच्छाशक्ति (Will) असल्याचें सार्त्र सागतात.

एवंच, मानवी जीवनाचा हेतु कोणता ? आणि मानवी जीवनाचें साफल्य कशात आहे ? या दोन्ही प्रश्नाची उत्तरे ईश्वराविना पोरक्या असलेल्या या विश्वात प्रत्येक माणसानें स्वतः व्यक्तिशः द्यावयाची आहेत. " . . . Life is nothing until it is lived; but it is your to make sense of, and the value of it is nothing else but the sense that you choose. . ." आपल्या जीवनांत, व्यक्तीनें कोणत्या मूल्यांना अग्रहक्क द्यावेत, आणि कोणता जीवनमार्ग चोखाळावा, हें ठरविण्याचा त्या व्यक्तीशिवाय इतर कोणालाहि अधिकार नाही. साहजिकच समाजजीवनांतील अन्य कोणीहि उभारलेली मूल्यांची श्रेणी आणि सोपानपरंपरा अस्तित्ववादी तत्त्वेत्यांच्या दृष्टीनें निरर्थक आहे. अरण्यांत जाऊन ईशसेवा करणारे आणि तुरुंगांत जाऊन देशसेवा करणारे असे दोन्ही प्रकारचे ' भक्त ' अस्तित्ववादी विचारवंताच्या दृष्टिकोनांतून सारख्याच योग्य-

तेचे आहेत. व्यक्तिधर्मानुसार आपल्या जीवनाला कोणीहि कसाहि अर्थ द्यावा. मात्र हा अर्थ प्रत्यक्षांत कृतीच्या रूपानें व्यक्त करण्यास प्रत्येक व्यक्ति बद्धपरिकर आहे. सार्त्र म्हणतात– " ....Man makes himself; he is not found ready-made; he makes himself by the choice of his morality, and he cannot but choose a morality-such is the pressure of his circumstances upon him. We define man only in relation to his commitments .... "

स्वतःच्या व्यक्तिधर्मानुसार आपल्या जीवनाचा मार्ग शोधण्याचें जीं माणसें टाळतात, (आणि म्हणून ज्यांना प्रवाहपतितांचें जिणें कंठावें लागतें) अशी माणसें–

आणि व्यक्तिधर्माचा शोध घेतांना जीं माणसें आत्मवंचना करतात, आणि निवडलेला जीवनमार्ग चोखाळतांना जे अप्रामाणिक होतात, अशीं माणसें–अस्तित्ववादी विचारवंतांच्या दृष्टिकोनांतून जीवनांत 'पराजित' होतात.

—'तेथें चल राणी' ही अशाच पराजित झालेल्या नायक–नायिकांची कथा आहे.

× × ×

कोठल्यातरी अज्ञात राज्यांतील जुलमी बादशहाची राजवट उखडून टाकण्यासाठीं जनतेंतून बंडाचा उठाव मोठ्या कौशल्यानें आणि आत्मविश्वासानें आंखणारा या कथेंतील नायक पॅरी, वस्तुतः प्रत्येक समाजांतील घडू पाहणाऱ्या क्रांतीचें नेतृत्व करणाऱ्या पुढाऱ्यांचा प्रतिनिधि आहे. अशा नेतृत्वास लागणारे संघटन–चातुर्य, विध्वंसक कर्तृत्व, सर्वस्वाचा त्याग करण्याची तयारी, निश्चयाचा करारीपणा, कर्तव्यकठोर वृत्ति इ. अनेक बाबीवर पॅरीचें उपजतच प्रभुत्व असावेंसें वाटतें. कोणत्याही विध्वंसक चळवळीला वैचारिक जागृतीपेक्षां, सामान्य मानवाच्या भावनांचा सवंग प्रक्षोभ अधिक उपयोगी पडतो, हें राजकारणपटूचें व्यावहारिक शहाणपणहि

त्यानें आत्मसात् केलेलें आहे. म्हणूनच वैचारिक दृष्टचा आंधळ्या आणि पांगळ्या सहकाऱ्यांचा जमाव जमा करून या कथेचा नायक, कार्यक्रमाच्या भाऊगर्दीतून दौड करतांना कादंबरीच्या आरंभीं दृष्टोत्पत्तीस पडतो. समाज-जीवनाच्या एका मार्गावर जी स्थिति नायकाची आहे, तशीच कौटुंबिक जीवनाच्या एका पर्वात कथानायिका ईव्ह हिची आहे. आपल्या अधम पतीपासून आपल्या लाडक्या बहिणीचें रक्षण करण्यासाठीं जणूं तिनें धर्मयुद्ध मांडलें आहे, असें दिसतें. बरे अगर वाईट—पण आपले जीवनमार्ग या कहाणींतील नायकनायिकांनीं निवडले आहेत, आणि प्रत्यक्ष कृतींत आणले आहेत. मात्र हे जीवनमार्ग निवडतांना आणि प्रत्यक्षांत चोखाळतांना पदरांत पडणाऱ्या यशावर त्यांचे डोळे खिळले आहेत. त्यांच्या प्रत्येक कृतीला व्यावहारिक यशाचा विचार प्रेरक झालेला आहे, वृत्तीनें तीं दोघेहि अंतर्मुख नाहींत. जीवनांतील अत्यंत महत्त्वाचे निर्णय घेण्याच्या कालांत उपकारक होणारें आत्मपरीक्षण करण्याची त्यांना फुरसत नाहीं, व जरूरीहि वाटत नाहीं. आपल्या प्रत्येक कृतीचें मूल्यमापन तीं दोघे, प्रत्यक्ष हातीं पडणाऱ्या श्रेयसिद्धीवरून करण्याचा यत्न करतात. म्हणूनच या बुद्धिमान आणि कर्तबगार व्यक्तींच्या जीवनांत एक सूक्ष्म स्वरूपाची आत्म-वंचना व्यक्त होतांना आढळते. अशा व्यक्ति कांहीं एका चमत्कारानें जर अन्तर्मुख होऊं शकल्या, स्वतःचा शोध घेऊं लागल्या आणि स्वतःच्या जीवनाची पुनर्रचना करण्याची त्यांना संधि प्राप्त झाली— तर ?

तोच चमत्कार या कादंबरींत कांहीं अद्‌भुतरम्य घटना निर्माण करून, लेखकानें नायक—नायिकेच्या बाबतीत करून दाखविला आहे. ईव्ह आणि पॅरी यांच्या गतिमान जीवनाला लेखकानें आरंभींच मृत्यूचा ब्रेक लावला आहे. या दोघांची मृतावस्था म्हणजे स्वतःचें जीवन आणि सभोंवतालचें जगत् यांचें स्वरूप न्याहाळण्यासाठीं लेखकानें निर्माण केलेली एक दुर्बीण आहे. ही अवस्था म्हणजे त्यांचें कर्तृत्व हिरावून घेऊन लेखकानें त्यांना दिलेली अन्तर्मुखतेची आणि आत्मपरीक्षणाची अमूल्य संधीच होय. कारण याच अवस्थेंत, यशापयशावर दृष्टि ठेवून केलेल्या कर्तृत्वानें कोणाचेंहि जीवन सफल होत नाहीं, हें त्यांना कळून चुकतें;

स्वतःच्या उणिवाची त्यांना जाणीव होते, सभोंवतालीं घडणाऱ्या अनेक घटना त्यांना इतिहासाच्या व्यापक नि मानवतेच्या विशाल बैठकीवर उमजूं लागतात; माणसाच्या कर्तृत्वाचा पांगळेपणा त्यांच्या प्रत्ययास येतो; माणसाच्या आंधळेपणांतून निर्माण झालेली दुःखें त्यांना दिसूं लागतात; आणि मानवाचा एकाकीपणा (loneliness) त्याच्या शिरावरील जबाबदारी, आणि त्याच्या कर्तृत्वांतील अपुरेपणा या वस्तुस्थितीचें त्यांना स्पष्टपणें आकलन होतें. त्यामुळेंच मृतावस्थेंत आल्यावर आपलें जीवन सफल झाल्याचा त्यांचा अहंकार गळून पडतो. क्रांतीचा उठाव करणाऱ्या आपल्या सहकाऱ्यांना आपल्याला वांचविता येऊं नये, या प्रत्ययानें पॅरी अधिकाधिक विकल होत जातो. आपल्या अधम पतीपासून आपल्या बहिणीचें रक्षण करणें आपल्याला अशक्य आहे, या प्रत्ययानें 'ईव्ह'च्या मनाची तगमग होते. विनाशाच्या मार्गाचीच जिनें निवड केली आहे, अशा ल्यूसेटाच्या रक्षणासाठीं, जिवंत असतांना आणि मृत्यूनंतरहि ईव्ह आकाशपाताळ एक करते. पण दुसरी व्यक्ति कितीहि निकटची असली तरी आपल्या जीवनमार्गाची जबाबदारी ज्या त्या व्यक्तीनें स्वतःच उचलली पाहिजे, या कठोर सत्याचा तिला उमज पडत नाहीं. ईव्हच्या या आत्मवंचनेंतूनच तिची अगतिकता आणि तिचें दुःख निर्माण होतें. क्रांतीसारख्या सामुदायिक घडामोडीची आंखणी आणि उठाव यांनाच फक्त नेता झाला तरी जबाबदार राहूं शकतो. अशा घडामोडींतून यशापयशाची हमी कोणालाहि देतां यावयाची नाहीं. निदान कोणत्याहि नेतृत्व करणाऱ्या माणसाच्या व्यक्तिजीवनाची सफलता तरी त्यावर खास अवलंबून नसते. पॅरी या समजापासून स्वतःच्या अहंकारानें दुरावतो. त्यामुळेंच मृत्यूनंतर ज्या वेळीं त्यानें सुरक्षित म्हणून आंखलेल्या क्रांतीच्या मनसुब्याखालीं दोन हात बादशहानें स्वतःचे सुरुंग पेरून ठेवलेले त्याला दिसतात, त्या वेळीं आपलें कर्तृत्व मातीमोल झाल्यासारखें त्याला वाटूं लागतें.

मृत्यूनंतर अशा अगतिक अवस्थेंत असतांनाच ईव्ह आणि पॅरी यांची समानप्रकृति आणि समानदुःख यामुळें ओळख होते. या ओळखीचें न कळत मैत्रींत आणि अखेर प्रीतींत पर्यवसान होतें. प्रणयांतील अननयाच्या उन्मा-

दानें पॅरी आणि ईव्ह आपल्या समस्या क्षणभर विसरतात; आणि ज्या उन्मादामुळें त्यांना क्षणभर कां होईना, पण दुःखविस्मृतीचें वरदान प्राप्त झालें, त्या प्रणयाचे ते दोघे भक्त होतात. प्रणयांतील अनुनयाच्या सुखाला तीं दोघे इतकी हुरळून जातात कीं त्यांना आपल्या मूळ जीवितहेतूचा विसर पडतो, इतकेच नव्हे तर ' आपण दोघे एकमेकासाठीच निर्माण झालों ' असल्याची भाषाहि ते बोलू लागतात. अशा रीतीनें पलायनवादी मनोवृत्ती-तून ईव्ह आणि पॅरी प्रणयाच्या जीवनमार्गाशी वचनबद्ध होतात. त्यामुळेंच त्यांची प्रीति आत्मार्पणापेक्षां अनुनयाभोंवतीच गुजन घालीत राहते. त्यामुळे स्वप्नाळूपणाचें कवच फोडून ती विकसित होऊ शकत नाही. मृता-वस्थेत नृत्यगृहात ईव्हबरोबर नृत्य करीत असतांना पॅरीनें ईव्हला उद्देशून काढलेले उद्‌गार या दृष्टीनें अत्यत अर्थसूचक आहेत. तो म्हणतो, ..." काय चमत्कार आहे हा ! घटकेपूर्वी माझ्या मनाला चिंतेच्या अनेक जळवा लागल्या होत्या आणि आतां मी इथे तुझ्याबरोबर नृत्य करीत आहे; आणि तू आणि तुझे मधुर स्मित याखेरीज मी कांहीहि पाहूं शकत नाही. तुझ्या-शिवाय माझ्या मनांत कसलाहि विचार नाही...."

पण हे उद्‌गार प्रीतीच्या विश्वरूप साक्षात्कारापेक्षां स्वप्नाळू आकर्ष-णाचें आणि पलायनवादी मनोवृत्तीचें अधिक द्योतक आहेत. प्रीति म्हणजे सवंग आकर्षण वा लाघवी अनुनय नव्हे. प्रीति म्हणजे एका जीवनमार्गावर आलेली विफलता क्षणभर विसरण्यासाठीं शृंगाराचे तयार केलेलें मद्य नव्हे. प्रीति ही मानवी जीवनांतील एक प्रबल शक्ति आहे. अनेक जीवनमार्गा-प्रमाणेंच प्रीति हाहि एक आत्मविकासाचा आणि आत्मसाक्षात्काराचा प्रभावी मार्ग आहे प्रीति ही एक उग्र तपस्या आहे. आत्मार्पणाचें तें एक योगसाधन आहे. सुप्रसिद्ध कवि अनिल ' प्रेम आणि जीवन ' या कवितेंत एके ठिकाणीं म्हणतात—

" जगणे आहेच धर्म सर्वाचा  
प्रेमी जनांचे तें कर्तव्य आहे !  
कारण प्रेमानें पुढें व्हायाची  
प्रगती जगाची, संस्कृतीचीही.

मानव जातीची जगतांतल्या
पटवुनी देते प्रेम समता
पूर्णपणाकडे जग नेण्याची
प्रेम एकच चिच्छक्ति आहे....''

पण ईव्ह आणि पॅरी यांना प्रीतीचे हे अंतरंग उमगत नाही त्यामुळेच स्वत:चे जीवनधर्म न ओळखता तीं दोघे आंधळेपणानें प्रणयमार्गाशी वचन-बद्ध (Committed to love) होतात.

याच सीमेवर लेखकानें अत्यंत कल्पकतेने आणखी एक अद्‌भुतरम्य घटना निर्माण करून कथेला अनपेक्षित कलाटणी दिलेली आहे. स्वर्गलोकातील कायद्याच्या कांहीं तात्रिक कलमांचा फायदा मिळून ईव्ह आणि पॅरी यांना आपले प्रणयी जीवन सफल करण्यासाठी परत मृत्युलोकी जाण्याची शक्यता निर्माण होते. "आपण एकमेकांसाठीं निर्माण झालों आहोंत"–अशी प्रीतीची घोषणा करणाऱ्या, आणि त्याचवेळी, "केवळ परिस्थितीमुळेंच आपले मीलन घडू शकलें नाही–" असे केवळ परिस्थितीवर आपल्या विफल जीवनाचें खापर फोडू पाहणाऱ्या, या नायक–नायिकेस आपलें वचन खरें करून दाखविण्याचे आव्हान, या घटनेच्या रूपाने लेखकाने दिलेलें आहे. वस्तुस्थितीचे स्पष्ट ज्ञान घेऊन, मानवी जीवनाच्या मर्यादा ओळ-खून, आपले जीवितहेतु आंखून घेऊन आपल्या जीवनाची पुनर्रचना कर-ण्याच्या उमेदीनें ईव्ह आणि पॅरी पुन्हा जिवत होऊन पृथ्वीतलावर परत-तात. परंतु ज्या जीवनमार्गाची निवड आत्मवंचनेंतून आणि पलायन-वादी वृत्तीतून झालेली आहे, त्या जीवनमार्गावरील स्वप्नाळू आकर्ष-णाची आणि अनुनयाची कोंवळिक संपल्यावर, येणाऱ्या वास्तवतेच्या कढत झळांमुळें ईव्ह आणि पॅरी होरपळून जावेत, ही घटना अपरिहार्य आहे. जिवंत सृष्टीत परत पदार्पण करतांच, ईव्ह आणि पॅरी यांना कृत्रिम रीतीने एकत्र आणणाऱ्या पलायनवादी प्रीतीची माया वितळू लागते; परस्परातील अंतराय आणि अविश्वास दुणावू लागतात; उभयतांचीं मनें जीवितहेतूबद्दल दुभंग होतात. त्याचा परिणाम म्हणूनच आपआपल्या जीवनधर्माकडे पाठ फिरवून दोघेंहि अप्रामाणिकपणें, मृत्यूच्या भयाच्या

दडपणाखालीं अगतिकतेनें प्रीतीचा मार्ग चोखाळूं लागतात. प्रीतीच्या तपस्येंतील कोणतेंहि दिव्य पार पाडण्याइतकी ईव्ह आणि पॅरी यांची या मार्गावर श्रद्धा नव्हती अशी श्रद्धा नसतांना केवळ पलायनवादी मनोवृत्तीं-तून ते या मार्गाशीं वचनबद्ध झाले. आपल्या स्वतःच्या व्यक्तिधर्माशीं साहजिकच त्यांना प्रतारणा करावी लागली. म्हणून प्रणयांतच नव्हे, तर जीवनसाधनेंतहि ईव्ह आणि पॅरी पराजित झाले.

—'आजच्या मानवसमाजांतील एक करुण कहाणी' म्हणून वर मी ज्याचा उल्लेख केला होता ती हीच होय.

हंसराज प्रागजी ठाकरसी कॉलेज
नासिक
दि. १५ ऑगस्ट १९५४

**वसन्त कानेटकर**

## ईव्हच्या शय्यागृहांत—

ईव्ह चार्लीयर शय्येवर निजलेली आहे.

तिच्या शय्यागृहांत किंचित् अर्धवट उघड्या असलेल्या झरोक्यांतून प्रकाशाचे स्रोत आंत येत आहेत. अंगावर ओढलेल्या उबदार रजईशीं आपल्या थरथरत्या बोटांनी ईव्ह अस्वस्थपणें चाळा करीत आहे. तिच्या बोटांतील लग्नभेटीची आंगठी झरोक्यांतून येणाऱ्या प्रकाशकिरणांनीं क्षणभर उजळते, नतर हे किरण हळू हळू तिच्या हातावरून वर सरकूं लागतात; आणि अखेर ते ईव्हच्या मुद्रेवर क्षणभर स्थिरावतात.

तिचे डोळे मिटलेले आहेत. तिचा श्वास गुदमरल्यासारखा झाला आहे. कसल्या तरी असह्य वेदना होत असाव्यात. कारण ती कण्हत आहे, आणि या कुशीवरून त्या कुशीवर अशी तिची सारखी तडफड चालली आहे.—

या दालनांतील एक दरवाजा हळूच लोटून एक माणूस आंत डोकावतो. त्याचा पोशाख मोठा ऐटबाज आहे. त्याचे टपोरे, चमकदार, पिंगट रंगाचे डोळे, आणि त्याने ठेवलेल्या अमेरिकन पद्धतीच्या मिशा, यामुळें हा पस्तिशीच्या आसपासचा गृहस्थ भारी रुबाबदार दिसत आहे. या सद्गृहस्थाचं नांव आॅंद्रे चार्लीयर!

दारांतूनच डोकावून आॅंद्रे, शय्येवर निजलेल्या आपल्या पत्नीकडे न्याहाळून पाहतो. पण त्या पाहाण्यांत ममतेपेक्षां मतलबीपणाच अधिक आहे.

आॅंद्रे हळूच आंत येऊन दार बंद करून घेतो; पावलांचा आवाज न करतां तो आपल्या पत्नीच्या शय्येजवळ येऊन उभा राहतो, आणि तिच्या मुद्रेकडे एकाग्र दृष्टीनें पाहूं लागतो. ईव्हला अर्थात्च त्याचीं चाहूल लागत नाहीं. ईव्ह आपल्या शय्येवर खिळून पडली असली तरी तिनें आपल्या सायंपोशाखावर एक सुदर मूल्यवान् गाउन परिधान केलेला आहे.

आँद्रे क्षणभर विचारमग्नतेनें आपल्या पत्नीच्या मुखावर होणारे फेरबदल लक्षपूर्वक पाहूं लागतो. तिला होत असलेल्या साऱ्या यातना तिच्या मुद्रेवर उमटलेल्या दिसत आहेत. आँद्रे हळूंच खालीं वाकून मृदु स्वरांत तिला हांक मारतो–" ईव्ह..ईव्ह.."

ईव्हच्या डोळ्यांची यत्किंचित्‌हि हालचाल होत नाहीं. उलट तिची मुद्रा अधिकच यातनाजर्जर आणि गलितगात्र दिसू लागते. बहुधा तिला झोंप लागली असावी!

आँद्रे ताठ उभा राहून शय्येशेजारींच मेजावर ठेवलेल्या तिच्या पाण्याच्या ग्लासकडे नजर टाकतो. हळूच आपल्या कोटाच्या खिशांतून तो एक कुपी भीत भीत बाहेर काढतो; आणि तिच्यांतील कांहीं थेंब पाण्यानें भरलेल्या ग्लासमध्यें तो टाकतो. तेवढ्यांत ईव्ह मान वळवून कुशीवर वळते. त्या बरोबर गडबडीनें आँद्रे ती कुपी आपल्या कोटाच्या खिशांत दडवतो. आपल्या झोंपी गेलेल्या पत्नीकडे आँद्रे एक सूक्ष्म कठोर दृष्टिक्षेप टाकतो.

## शेजारच्या दालनांत–

शेजारच्या दालनांत एक तरुण मुलगी खिडकीशीं रेलून बाहेर पहात उभी आहे. रस्त्यावरून कवायती पलटणीच्या बुटांचा तालबद्ध आवाज ऐकूं येत आहे.

आँद्रे चार्लीयर या दालनांत प्रवेश करतो. आणि दार घट्ट लावून घेतो. त्याच्या मुद्रेवर चितेचे ढग जमू लागले आहेत. दार बंद केल्याच्या आवाजानें ती तरुण मुलगी मागें वळून पाहते. ती स्वरूपानें अत्यंत देखणी आहे यांत शंकाच नाहीं. बहुधा सतराव्या वर्षांत तिनें पदार्पण केलें असावें. वृत्तीनें ती जरी गंभीर दिसत असली तरी तिच्या कोवळ्या मुद्रेवरील कौमार्य अजून लुप्त झालेलें नाही. बाहेर रस्त्यावर सैनिकांचे बूट खटखटत आहेत आणि मोठमोठ्यानें बॅंडच्या तालासुरावर कसल्या तरी संघगीताचे ध्वनि उमटूं लागले आहेत.

त्या तरुण मुलीच्या मनांत कांहीं एक विचार डोकावतो. आणि एकदम धाडकन् खिडकीचें दार ती लावून घेते. आपल्या मनांतला प्रक्षोभ आवरतांना तिला भारी कष्ट होत असले पाहिजेत. आँद्रेकडे वळून उद्वेगानें ती म्हणते, "सकाळपासून या सैनिकांच्या वर्दळीचीही कटकट कांहीं ओसरली नाहीं." आँद्रे तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केल्यासारखें करून अस्वस्थतेनें कोचापाशीं येऊन थबकतो. ती तरुण मुलगी त्याच्याजवळ जाते, आणि काळजीच्या प्रश्नार्थक मुद्रेनें ती त्याच्याकडे पाहूं लागते. अखेर मान वर करून तो तिच्याकडे पाहतो, आणि उद्विग्नतेनें म्हणतो, " तिला झोंप लागली आहे."

"ती बरी होईल असं तुला वाटतं का ?"

आँद्रे स्तब्ध राहतो. अस्वस्थतेनें ती तरुण मुलगी एक पाय कोचावर ठेवून आपल्या दोन्ही हातांनीं त्याला गदागदा हलविते. तिच्या डोळ्यांतून अश्रू तरळू लागतात. ती एकदम ओरडते. "मला असं लहान पोरीसारखं वागविण्याचं सोडून देशील काय ? मी काय विचारते त्याचं उत्तर दे."

आँद्रे आपल्या बायकोच्या बहिणीकडे क्षणभर रोखून पाहतो. हलकेंच तिच्या केंसावरून मायेनें हात फिरवितो आणि आपल्या स्वरांत शक्य तितकें मार्दव आणि दुःखाची छटा आणण्याचा प्रयत्न करून तो उद्गारतो— "ल्युसेटा, तुला फार धीरानें वागलं पाहिजे !"

ल्युसेटा कोचावर डोकं ठेवून हुंदके देऊन रडू लागते. तिचें दुःख, तिचा उद्वेग प्रामाणिक आहे, प्रांजळ आहे पण किंचित् पोरकट आणि उतावळा आहे. ती अजूनहि एकाद्या अल्लड पोरीप्रमाणें वागते आहे.

आँद्रे हळूच म्हणतो, "ल्युसेटा, . . . "

ती मान हलवते आणि ओरडते, " जा, जा. मला एकटीलाच राहूं दे . . . मला एकटीलाच राहूं दे. धीरानं वागण्याच्या गोष्टी मला शिकवूं नकोस. तूं अगदीं निर्दय आहेस ! तिच्याशिवाय माझं कसं होईल रे . . "

तिच्या केंसावरून हात फिरवीत आणि हळूच तिच्या खांद्याला स्पर्श करीत आँद्रे निश्चयपूर्वक म्हणतो, " ल्युसेटा, शांत हो ! असं वेड्यासारखं करून कसं चालेल ?"

आँद्रे तिच्या पाठीमागें येऊन उभा राहतो. आतां त्याचा चेहरा तिच्या दृष्टीला पडत नसल्यानें त्याच्या मुद्रेवर पुन्हां एकदां क्रूर कठोर भाव उमटूं लागतात. ती तरुण मुलगी बोलत असतांना तो तिच्या मुद्रेकडे कावेबाज-पणें लक्ष देऊन पाहत आहे.

" एक दिवस आशेचा उगवतो आणि दुसऱ्या दिवशीं निराशेंत तड-फडावें लागतें. माणसाला वेड लागायची पाळी येईल अशानं. ती मला किती प्रिय आहे याची तुला थोडी तरी कल्पना आहे का ?"

या प्रश्नाबरोबर ती एकदम मान मोडून आँद्रेकडे नजर टाकते. त्याबरोबर त्याच्या मुद्रेंत तात्काल फरक पडतो आणि पूर्वीप्रमाणें तो आपली मुद्रा दु:खी कष्टी दर्शवितो.

" आँद्रे, बहिणीच्या नात्यापेक्षांहि ती मला अधिक जवळची आहे"– हुंदके देत ती बोलू लागते, " ती मला आईच्या ठिकाणी आहे. माझ्या जिवलग मैत्रिणीसारखी ती मला प्रिय आहे. पण ते तुला समजायचं नाहीं. तें कुणालाच समजायचं नाहीं ! "

आँद्रे तिच्या शेजारी बसतो. आणि किंचित् मायावी स्वरांत तिची कानउघाडणी करण्याच्या स्वरांत तो म्हणतो. "ल्युसेटा, ती माझी बायको आहे हें तू विसरलीस का ?"

ती गोंधळून त्याच्याकडे पाहते; त्याचा हात आपल्या हाती घेते, आणि म्हणते, " आँद्रे, तू म्हणतोस तें खरे आहे. मला क्षमा कर . . . . पण तिच्याशिवाय मी या जगांत पोरकी होईन ! अगदी उघडी पडेन ! "

" ल्युसेटा, तू असं म्हणतेस; मग माझी स्थिति काय होईल ? "

आँद्रे तिला जवळ ओढून घेतो. ती मोठ्या विश्वासानें आणि निष्पाप मनानें त्याच्या खांद्यावर मान टाकून त्याला बिलगते. तो दांभिकपणाने बोलू लागतो, " मी जोंपर्यंत तुझ्यापाशी आहे, तोंपर्यंत तूं 'मी पोरकी आहें' असले शब्द काढलेले मला आवडणार नाहींत. मी तुला कधीहि अंतर देणार नाहीं. आणि ईव्हला तरी यापेक्षा अधिक काय हवं आहे ? आपण एकत्र राहूं या हं, ल्युसेटा ! "

ल्युसेटा आतां बरीच शांत झाली आहे. डोळे मिटून तिनें त्याच्या छातीवर मान ठेवली आहे. मधून मधून लहान मुलीसारखे हुंदके देत ती त्याला घट्ट बिलगत आहे.

## राजरस्त्यावर—

बादशहाच्या सैन्याची अेक तुकडी एका गजबजलेल्या राजरस्त्यावरून कवाईत करीत चालली आहे. बुटक्या टोप्या, कडक खाकी पोषाख, चकचकीत कातड्याचे आडवे उभे पट्टे, आणि त्याला लटकलेल्या बंदुकी, अशा थाटांत हे सैनिक रस्त्यांतून खाड् खाड् बूट वाजवीत चालले आहेत.

अेकाअेकी ही सैनिकांची तुकडी अेक लष्करी संघगीत गाऊं लागते. त्याबरोबर कांहीं लोक चमकून पाहूं लागतात; कांही रस्त्यांतून घरांघरांत पळापळ करूं लागतात.

नुकतीच आपल्या मुलाला बाबागाडींत घालून बाहेर पडलेली एक स्त्री या सैनिकांना पाहतांच एकदम पाठ फिरवते; आणि परत घरांत शिरते. आजूबाजूच्या लोकांना तेवढीच गंमत!

सैनिकांचें पथक पुढें चाललें आहे. डोक्यावर लोखंडी शिरस्त्राण घातलेले दोन अधिकारी या पथकाच्या अग्रभागी चालत आहेत. त्यांच्या हातांत भरलेल्या बंदुका आहेत. ते जसजसे पुढें येत आहेत तसतसा रस्ता तत्काळ निर्मनुष्य होत चालला आहे. पण या पांगापांगींत, असंतोष आंतल्या आंत धुमसत आहे. एका किराणा मालाच्या दुकानासमोर उभे असलेले कांहीं स्त्रीपुरुष, तत्काळ एखादा परवलीचा हुकुम मिळावा तसे नाहींसे होतात. कांहीं दुकानांत शिरतात तर कांही गल्लीबोळांत शिरतात.

दूरवर रस्त्यांत कांही बाया भाजीवाल्यांशी हुज्जत घालीत उभ्या आहेत. त्या ताबडतोब घरांघरांत शिरतात. कांही वात्रट पोरें आपल्या खिशात हात घालून सैनिकांच्या बरोबरीनें त्यांची नक्कल करीत चालले आहेत. एका पडीक घराच्या दाराशी रेलून उभे राहिलेले दोन तरुण, सैनिकांची ही वाटचाल मोठ्या कुतुहलानें आणि उपहासानें पहात आहेत. त्या दोघांनीं आपला उजवा हात कोटाच्या खिशांत दडविला आहे.

## क्रांतिकारकांच्या तळावर—

एका धुरकटलेल्या त्या दरिद्री खोलींत खिडकीच्या दोन्ही बाजूला चार माणसें, बाहेरून आपणांस कोणी पहाणार नाहींत अशा बेतानें, उभे राहून, बाहेर रस्त्यावर पहात आहेत. त्यांपैकीं उंच, हडकुळा आणि गुळगुळीत चेहऱ्याचा तो लॅगलॉय; किंचित् बारीक, दाढी वाढवलेला आणि चंचल मुद्रेचा तो डिक्सन. पॉलीनचे केस पांढरे झालेले आहेत, आणि त्याच्या डोळ्यावर जाड भिंगाचा, निकेलच्या काड्यांचा चष्मा आहे. त्याच्या शेजारींच भरदार देहाचा आणि लालबुंद हंसऱ्या चेहऱ्याचा जो इसम उभा आहे, त्याचं नांव रेनॉडेल.

ही चारहि माणसें खिडकीपासून दूर होतात, आणि मागें वळून खोलीच्या मध्यभागी ठेवलेल्या एका टेबलाजवळ येतात. टेबलावर एक बाटली आणि बरेचसे कांचेचे पेले पडलेले आहेत. या टेबलावर आपल्या हाताचा एक कोपर टेकून एक तरुण शांतपणें धूम्रपान करीत बसला आहे. हाच तो पॅरी ड्यूमेन.

डिक्सनच्या आधीच किरकोळ दिसणाऱ्या मुद्रेवर चिंतेचीं अभ्रें दाटून येतात. तो पॅरीला विचारतो,

"तू पाहिलंस ना?"

पॅरी शांतपणें ग्लास उचलून तोंडाला लावतो आणि एक घोट घेऊन विचारतो—"काय पाहायचं म्हणून म्हणतोस?"

क्षणभर स्तब्धता! पॉलीन खालीं बसतो; रेनॉडेल सिगरेट शिलगावतो; आणि डिक्सन खिडकीकडे एक दृष्टिक्षेप टाकतो—तो म्हणतो—

"सकाळपासून सैनिकांचा हा धांगडधिंगा चालला आहे. मला वाटतं त्यांना कांहीं संशय आला असावा—"

पॅरीच्या शांत वृत्तींत थोडीदेखील चलबिचल होत नाहीं. थंडपणें ग्लास खालीं ठेवीत तो उत्तरतो— "कदाचित् शक्य आहे! पण उद्यां त्यांची काय विल्हेवाट लागणार आहे, त्याची त्यांना खात्रीनें कल्पना नाहीं!"

पॉलीन किंचित् घोटाळत म्हणतो—

" पण मला वाटतं . . ."

" काय वाटतं–?" –पॅरी तीव्र कटाक्ष टाकून चढ्या आवाजांत विचारतो.

" आपण उगाच घाई करूं नये–"

पॅरीच्या मुखावर नाखुषी स्पष्ट दिसते. रेनॉडेल चटकन् म्हणतो–

" फार नाहीं–फक्त तीन दिवस आपण थांबूं या. त्यांच्या मनांतल्या संशयाचें निराकरण होण्यास तेवढा अवधि पुरे –"

पॅरी त्याच्याकडे तीव्र संतापानें रोखून पाहतो आणि खोंचून विचारतो–

" इतक्यांतच तुझा धीर खचला काय ?"

रेनॉडेल एकदम भडकतो आणि ओरडतो– "पॅरी–" त्यावर पॅरी निर्णायक स्वरांत म्हणतो, "क्रांतीचा उठाव ही काय पुढें ढकलण्याची बाबत आहे ? आपली सर्व जय्यत तयारी झाली आहे. शस्त्रास्त्रें वांटलीं गेलीं. लोकांचीं माथी भडकून गेली आहेत. आपण थांबलों तर मग त्यांना कह्यांत ठेवणें अशक्य होईल.

रेनॉडेल आणि डिक्सन स्तब्ध राहतात. पॅरी प्रत्येकाच्या मुद्रेवरील भाव रोखून पाहून करारीपणानें विचारतो–

" मी काय म्हणतों आहें, तें तुम्हां सर्वांना मान्य आहे ना ?"

आपल्याला विरोध करण्यास कोणीहि धजत नाहीं असें पाहून पॅरी उत्साहानें बोलूं लागतो.

" ठीक आहे ! मग ठरलें तर ! उद्यां सकाळीं ठरल्याप्रमाणें बरोबर दहा वाजतां उठावाला प्रारंभ होईल, आणि उद्यां रात्रीं वस्तीला आपण बादशहाच्या राजवाड्याचा ताबा घेणार आहोंत–आतां मी काय सांगतों, तें नीट लक्षपूर्वक ऐका......"

चारहि माणसें गंभीर मुद्रेनें टेबलाजवळ सरकतात. पॅरी खिशांतून एक कागद काढून टेबलावर पसरीत सांगूं लागतो–

" आपला उठाव एकाच वेळीं तीन ठिकाणीं सुरू होणार आहे......'

## ईव्हच्या शय्यागृहांत–

ईव्ह अजूनहि शय्येवर झोपलेली आहे. तिचे डोळे मिटलेले आहेत. एकाएकीं ती दचकून कुशीवर मान चाळवते, आणि एकाद्या भयाण स्वप्नांतून जागें झालेल्या माणसाप्रमाणें ती आपले डोळे सताड उघडून भेसूरपणानें पाहूं लागते. घाबरल्या स्वरांत ती एकदम ओरडून हांक मारते–" ल्यूसेटा–" आणि मग चटकन् ती भानावर येते. पण तिची सारी काया तापानें फणफणली आहे. मोठ्या कष्टानें ती पांघरूण दूर करीत शय्येवरून उठून बसते. तोंच तिला चक्कर आल्यासारखें होतें म्हणून टेबलावर ठेवलेला पाण्याचा ग्लास ती उचलून घेते. पाण्याचे चार दोन घोट ती गडबडीनें पिते. तिची मुद्रा किंचित् विचित्र होऊं लागते. खोल गेलेल्या स्वरांत ती पुन्हां हांक मारते–" ल्युसेटा–ल्युसेटा "

## कटवाल्यांच्या रस्त्यावर–

एक अठरा वर्षाचा फिकट आणि खंगलेला पोरगा भेदरल्या स्वरांत हांक मारतो–" पॅरी–"

पॅरी नुकताच कटवाल्यांची बैठक संपवून त्या पडक्या घरातून बाहेर पडत आहे. आपल्याला कोणी हांक मारीत आहे हें लक्षांत येताच पॅरी तिकडे वळून पाहतो. परतु तो पोरगा दृष्टीला पडतांच तो कपाळाला आंठ्या घालून मान फिरवतो. दारावर पहारा करीत असलेल्या दोन माणसांना उद्देशून तो म्हणतो–" तुम्ही आतां गेलात तरी चालेल. बाकीची मंडळी आता इकडेच येत आहेत. आज संध्याकाळी सहा वाजतां इथेंच बैठक होईल. कांही कमी जास्त बातमी ? "

" कांहीं सुद्धां नाही–" त्यापैकीं एक भला दांड इसम उद्‌गारतो–" फक्त तो, तो पोरटा वर जायला पहात होता–"

त्या इसमानें दाखविलेल्या दिशेकडे पॅरी नजर टाकतो–" कोण ल्यूसीन ? ऊं–!" पॅरी हेटाळणीने उद्‌गारतो. घाईघाईत सर्व माणसें पांगतात. पॅरी आपल्या सायकलचें कुलूप काढून ती रस्त्यावर घेत अस-

तांनाच ल्यूसीन रस्ता ओलांडून त्याच्याजवळ येतो आणि आर्जवी स्वरांत हांक मारतो–

" पॅरी–"

पण पॅरी त्याच्याकडे ढुकूनहि पहात नाही. सायकलचें कुलूप काढून पॅरी आपल्या खिशांत किल्ली टाकतो. ल्यूसीन अजीजीनें म्हणू लागतो– " पॅरी, कृपा करून मला एकदां तरी बोलायची संधी दे–"

पॅरी त्याच्याकडे तिरस्काराचा एक कटाक्ष टाकतो. ल्यूसीन त्याच्याजवळ जात गयावया करीत म्हणतो,

" खरंच त्यांत माझा कांही अपराध नव्हता–"

पॅरी हाताच्या आविर्भावानेंच त्याला धुडकावून लावतो; व सायकल रस्त्यावर घेऊन चालू लागतो. ल्यूसीन अडखळत बोलू लागतो–

" त्यांनी माझा फार छळ केला; तासन् तास मारहाण केली; तरी देखील महत्त्वाची अशी कोणतीच बातमी मी त्यांना सांगितली नाही–"

पॅरी शांतपणे सायकलवर बसून रस्त्यांतून जाऊं लागतो. ल्यूसीन सायकलचें हँडल धरून त्याचेबरोबर धावत धावत अजीजीनें बोलू लागतो. त्याच्या मुद्रेवर राग आणि भीति उमटलेली आहे. प्रक्षोभानें तो ओरडतो–

" तुम्ही माझ्याशी फार निर्दयपणाने वागतां आहांत, मी अजून लहान आहे. तुम्ही साऱ्यांनी माझ्याकडे अशी पाठ फिरविलीत तर जन्मभर द्रोह केल्याबद्दल माझें मन मला खात राहील–पॅरी, त्यांनी मला त्यांच्या बाजूनें बातम्या काढण्यास सांगितलें होतें पण......"

पॅरी संतापानें त्याच्याकडे पाहूं लागतो. पण ल्यूसीन पिसाटाप्रमाणें ओरडू लागतो––" थांब, मला कांहीतरी उत्तर दिल्याखेरीज मी तुला जाऊं देणार नाही......"

पॅरी क्रोधानें त्याच्या गालफडांत भडकावून ओरडतो–" बदमाश, विश्वासघातकी, चल हो दूर ".

ल्यूसीन थिजल्याप्रमाणें जागच्या जागीं खिळून राहतो. तेवढ्यांत त्याला दूर सारून पॅरी सायकलवरून पुढें सटकतो. मागून कोठून तरी

सातमजली हास्याचा फवारा कानीं येतो. रेनॉडेल, डिक्सन, पॉलिन आणि लँगलॉय दुरून सारी गंमत पाहून हंसू लागले आहेत.

ल्यूसीन शरमिंधेपणानें खालीं मान घालून चालू लागतो. त्याच्या मुद्रेवर तिरस्कार आणि डोळ्यांत अश्रू उभे राहतात.

## ईव्हच्या शय्यागृहांत–

ईव्हचा हात शय्येशेजारील टेबलावरील ग्लासवर आहे. मोठ्या कष्टानें ती शय्येंतच उठूं लागते. पण शारीरिक वेदनेमुळें तिची तडफड होत आहे. शय्येवरून उठून खुरडत खुरडत ती कशीबशी दारापर्यंत जाऊन पोहोंचते. ती दार उघडते आणि दारांतच स्तब्ध होऊन पाहत राहते. आँद्रेच्या खांद्यावर मान टाकून ल्युसेटा कोचावर बसली आहे. तें दृश्य तिला दिसतें. क्षणार्धात त्या तरुण पोरीला आपल्या बहिणीची चाहूल लागते. ईव्ह रुक्षपणें हांक मारते–

'आँद्रे',

तत्काळ ल्यूसेटा आँद्रेच्या बाहुपाशांतून स्वतःला सोडवून घेते. आणि ईव्हच्या रोखानें धांव घेते. आँद्रे गोंधळलेल्या मनःस्थितीत उठून उभा राहतो. आणि निश्चयी पावलांत त्या दोघीपाशी येतो. ल्युसेटा किंचित् कानउघाडणी करण्याच्या स्वरांत म्हणते, "ईव्ह, तू अंथरुणांतून कां बर बाहेर पडलीस ?"

ईव्ह उत्तरते,–"ल्युसेटा, तू इथंच थांब. मला आँद्रेशीं एकट्याशींच कांहीं बोलायचं आहे."

ईव्ह पाठ फिरवून परत शय्यागृहांत जाते. ल्युसेटा विस्मयानं पहातच स्तब्ध उभी राहते. आँद्रे तिच्याजवळ येतो. आणि मोठ्या मायेनें तिला तिथेंच थांबण्यास सांगतो. नंतर तो घाईनें ईव्हच्या शय्यागृहांत शिरतो. पलंगावर बसलेली ईव्ह त्याला पाहतांच हलकेंच पण निश्चयी स्वरांत म्हणते–

"आँद्रे, यापुढं ल्युसेटाच्या अंगाला तूं स्पर्श करतां कामा नयेस.."

स्वत:ला आश्चर्य वाटल्याचें दर्शवीत आँद्रे जवळ येऊं लागतो. आपली सर्व शक्ति एकवटून ईव्ह बोलू लागते–

"उगीच कानावर हात ठेवून मोकळा होऊं नकोस ! मला सारं माहीत आहे. गेले कित्येक महिने तुझे सारे चाळे मी नीटपणें पहात आलें आहें. मी अशी आजारी पडल्यापासून तुझे असले उद्योग सुरू झालेत. मी सांगून ठेवतें, तिच्या अंगाला तू स्पर्श करतां कामा नये."

तिला बोलतांना भारी कष्ट होत आहेत. तिची सारखी तडफड चालू आहे. आँद्रे तिच्याकडे सूक्ष्मपणानें पहात आहे.

अडखळत ती म्हणते, "पैशाकडे पाहून तू माझ्याशीं लग्न केलंस आणि जन्मभर माझा छळ केलास. पण मी एका शब्दानं कधीं तक्रार केली नाही. पण माझ्या बहिणीच्या आयुष्याचा नाश मी तुला करूं देणार नाही......"

आँद्रे त्याच स्थिर दृष्टीनें तिच्याकडे पहात आहे. ईव्हला बसवत देखील नाहीं. पण ती मोठ्या आवेशानें म्हणते, "माझ्या आजारी-पणाचा तूं गैरफायदा घेतलास. पण लक्षांत ठेव! यांतून मी बरी होईन! नक्कीच बरी होईन! तुझ्यापासून तिचं मला रक्षण करायचं आहे." येवढं बोलून थकून ती उशीवर मान टाकते. आँद्रेची मुद्रा पांढरीफटक पडली आहे. टेबलावरील रिकाम्या झालेल्या ग्लासकडे तो अर्थपूर्ण दृष्टीनें पहात आहे. ईव्हचा खोल खोल जात चाललेला आवाज ऐकून त्याच्या मुद्रेवरील भाव भराभरा बदलत आहेत. खोल गेलेल्या आवाजांत ती म्हणत आहे–

"मी यांतून बरी होईन. आणि तिला दूर घेऊन जाईन......दूर ......दूर......अगदीं दूर".

## उपनगरांतील एका रस्त्यावर–

एका भिंतीच्या आड दडत दडत ल्यूसीन पाळत ठेवत चालला आहे. त्याचा चेहरा घामानं डबडबला आहे. मुद्रा फटफटीत पडली आहे. आणि कसल्या तरी भयंकर विचारानें त्याचे ओठ घट्ट मिटले आहेत. त्याचा एक हात जाकिटाच्या खिशांत दडलेला आहे.

दूरवर सुमारें शंभर यार्डावर पॅरी सायकलवरून येतांना दिसतो. त्या निर्जन आणि ओसाड रस्त्यावर तो अेकटाच सायकलवरून चालला आहे. एका कारखान्याच्या आवाराजवळून तो जाऊं लागतो. कारखान्यांत कामगार मालाची ने–आण करण्यांत गुंतले आहेत. ल्यूसीनच्या मुद्रेवरील प्रक्षोभ वाढत आहे. त्याच्या खिशातला हात थरथरत आहे. तो आजूबाजूला वळून थरथरत्या मनानें एकदां कानोसा घेतो. हळूच त्याचा हात खिशांतून बाहेर पडतो. त्या हातांत अेक भरलेलें पिस्तूल आहे.

## ईव्हच्या शय्यागृहांत–

खोल गेलेल्या आवाजांत घरघर लागलेली असतांनाहि ईव्ह मोठ्या कष्टानें बडबडत आहे, "मला बरं वाटेल.. आँद्रे, यांतून मी बरी होईन. .. तिला वांचविण्यासाठी तरी मला बरं झालं पाहिजे......"

तिचा हात थरथर कांपू लागतो, धडपडू, तडफडू लागतो. आणि अखेर टेबलावरील ग्लास तिच्या हातानें खालीं पडून फुटतो. तिला चक्कर आल्यासारखें वाटतें. आणि थरथर कांपणाऱ्या हातानें ती टेबलाचा आधार घेऊं लागते. तोच तिचा देह निष्प्राण होऊन खाली कोसळतो. त्या देहाकडे पाहून आँद्रेची मुद्रा काळवंडून जाते.

## उपनगरांतील रस्त्यावर–

ठो! ठो!

पिस्तुलांतून दोन गोळ्या सुटतात. पॅरी कसाबसा दोन चार पावलें पुढें जाऊं शकतो. आणि मग धडपडून रक्ताच्या थारोळ्यात तो जमिनीवर कोसळतो.

## ईव्हच्या शय्यागृहांत–

ल्युसेटा दार उघडून आंत धांवत येते. ईव्हचा निष्प्राण देह तिच्या नजरेला पडतो आणि ती हंबरडा फोडते.

## उपनगरांतील रस्त्यावर–

रस्त्याच्या मध्यभागी सायकलच्या शेजारी पॅरीचा देह पडलेला आहे. सायकलचें अेक चाक मोडून सुटें होऊन घरंगळत दूर गेलें आहे. भिंतीआड दडलेला ल्यूसीन स्वतःच्या सायकलवर उडी मारून बसतो. आणि शक्य तितक्या जोरानें दूर दवडतो.

कारखान्यांतील कामगारांचें काम थांबतें. पिस्तुलाचा आवाज अैकतांच ते आसपास पाहूं लागतात. त्यांच्यापैकीं कोणी अेक रस्त्यावर येऊन काय प्रकार झाला आहे तें पाहूं लागतो. तेवढ्यात अेक ट्रक पॅरी पडला आहे, तेथें येऊन उभी राहते. गाडींतून शोफर आणि दोन कामगार झटकन् खालीं उडी मारतात. कारखान्यांतून इतर कामगारहि पळत पळत येतात. थोड्याच वेळांत पॅरीच्या देहापाशीं माणसांची बरीच गर्दी जमते. जमलेलीं माणसें पॅरीला ओळखतात. आणि त्याच्यात खळबळ उडते. आपसांत तीं मोठमोठ्यानें आणि तावातावानें बोलू लागतात. पण जवळ आलेल्या लष्करी सैनिकांच्या पावलांचा आवाज त्यांच्या कानी येत नाही. अेकदम् जवळपास लष्कराचें संघगीत सुरू होतें. सर्वांचें लक्ष एकदम् तिकडे वळतें. अेक कामगार तिरस्कारानें सैनिकांकडे दृष्टिक्षेप टाकून म्हणतो–

"शंकाच नाही! यांच्याशिवाय दुसऱ्या कुणाचें हें काम असणार?"

इतक्यांत सैनिकांची तुकडी जवळ येऊन पोहोंचते. त्यांना जणू भिडण्यासाठीच सारीं माणसें ताठ उभी राहतात. त्याच्या डोळ्यात अंगार उसळला आहे. कोणी कोणी तर शिव्याशापाचा वर्षाव करीत आहेत. सैनिकांची तुकडी गात गात पुढें चालली आहे. रस्त्यावर उभे असलेल्या कामगारांची गर्दी बघून, त्यांच्या प्रमुख अधिकाऱ्याच्या कपाळावर आंठ्या उमटतात. सारे कामगार चिडून रस्ता अडवून उभे राहिले आहेत. त्यांतले कांही रस्त्याच्या कडेला जाऊन दगडाचे आणि लोखडाचे तुकडे उचलं लागतात. आणखी थोड्या पावलांवर हा अधिकारी आपल्या सैनिकांना खडे राहण्याचा हुकूम फर्मावतो. आणि नेमक्या याच वेळी–

नेमक्या याच वेळी पॅरीचा देह जमिनीवर पसरला असतांना, त्याच्या देहांतून दुसरा एक पॅरी हळूच उठून त्याच्या पायथ्याशीं उभा राहतो. हा दुसरा पॅरी जणूं काय एखाद्या स्वप्नांतून माणसानें जागें व्हावें, त्याप्रमाणें उठून उभा राहिला आहे. आपला कोट आणि शर्ट तो हातांनीं झटकत आहे. कामगाराच्या समोर तो उभा राहिला आहे. हा दुसरा पॅरी जवळच्या इसमाला ढोसून विचारतो–

" पॅवलो, काय भानगड आहे बरें ही ? "

ज्याला ढोसून पॅरी बोलला आहे तो कांहीच उत्तर देत नाही. तो फक्त पाठ वळवतो आणि दगड गोळा करण्यांत गुतलेल्या कामगारांना हलकेच म्हणतो–

" माझ्याजवळ द्या. "

त्याबरोबर दुसरा एक कामगार पॅवलोच्या हातांत एक विटकरीचा तुकडा देतो. कठोर आवाजांत सैनिकांचा अधिकारी जमलेल्या माणसांना हुकूम देतो–" रस्त्यावरून निघून जा. "

कामगारांच्या गर्दीमधून एकहि मनुष्य तसूभरहि हालत नाहीं. पॅरी या कामगारांच्या भोंवती आणि सैनिकांच्या तुकडीच्या भोंवतीं हळू हळू चक्कर मारून येतो. आणि स्वतःशींच पुटपुटतो–

" कांहीतरी भानगड झालेली दिसते! "

नंतर दोन माणसांच्या मधून तो घाईनें जाऊं लागतो. अर्थात् त्या माणसांना तो दिसतच नाहीं. दगडविटा हातांत घेऊन उभे असलेल्या कितीतरी ओळखीच्या कामगाराच्या अंग[illegible]न तो जात आहे. पण तेहि त्याला पाहिल्यासारखें दर्शवीत नाहींत. प्रत्येक वेळीं या प्रकारामुळें पॅरी आश्चर्यचकित होत आहे. त्याला कांहीं समजेनासें झालें आहे. अखेर तो किंचित् खांदे उडवतो आणि कांहीं समजून घेण्याचा प्रयत्नहि सोडून देतो.

सैनिकांचा अधिकारी पुन्हां एकदां करारीपणानें उद्गारतो–

" रस्ता सोडून चालते व्हा. एक पाऊलहि पुढें टाकूं नका. "

## ईव्हच्या शय्यागृहांत—

आँद्रे आणि ल्युसेटा हे दोघे मिळून ईव्हचा मृत देह उचलून शय्येवर ठेवतात. आँद्रे तिच्या शवावर पांघरूण ओढून घालीत असतां, ल्युसेटा हंबरडा फोडून जमिनीवर लोळण घेते. आणि आकांत करूं लागते.

त्याच वेळीं ईव्हच्या मृत देहांतून उठून उभी राहिलेली दुसरी ईव्ह, ल्युसेटाच्या मस्तकावरून मायेने हात फिरवू लागते. पण ल्युसेटाला तिच्या हाताचा स्पर्शहि होत नाही. ईव्हच्या मुद्रेवर आश्चर्याची छटा उमटू लागते. एखाद्या क्षुद्र कारणासाठीं दुःख करून घेणाऱ्या माणसाचें जसें हंसू यावें, तसें स्मित तिच्या ओठावर दिसू लागतें. किंचित् खांदे उडवून ईव्ह दुसऱ्या दालनांत येते. तिच्या अंगावर अजून मघाचा सुंदर मूल्यवान् गाऊन रुळतांना दिसत आहे.

ल्युसेटाचा विलाप ऐकून, ईव्हची नोकराणी रोझ, घाईघाईने शय्या-गृहाकडे धांव घेतांना ईव्हला आढळते. रोझच्या जिवाची धादल उडालेली पाहून ईव्हला किंचित् मौज आणि आश्चर्य वाटतें. ती हांक मारते—

"रोझ—"

पण रोझ ईव्हच्या शय्यागृहांत पाहिलेल्या प्रकारानें धक्का बसून घाईघाईनें परत स्वयंपाक घराकडे पळू लागते. ईव्ह पुन्हां एकदां विस्मयानें म्हणते—

"पण रोझ, अशी घाईघाईनें तू चाललीस तरी कोठें?"

पण रोझ तिला मुळींच उत्तर देत नाहीं; इतकेंच नव्हे तर तिच्या अस्तित्वाचीही ती दखल घेत नाहीं. याचें तिला भारी नवल वाटतें.

एकाएकीं एक आवाज तिच्या कानांत घुमू लागतो. प्रथम हलक्या स्वरांत— आणि मग मोठ्यामोठ्यानें तिच्या कानांत शब्द घुमूं लागतात—

"मृतात्म्यांच्या वसाहतीकडे...... मृतात्म्यांच्या कचेरीकडे.."

दालनांतून ईव्ह बाहेरच्या व्हरांड्यांत येते. एकदम् ती थबकते. तिच्यासमोर एक मोठा उंच, माणसाची सबंध प्रतिमा दिसेल असा, आरसा लावलेला आहे. या आरशांत ईव्ह वारंवार आपलें लावण्य न्याहाळीत असे.

ईव्ह नेहमींच्या संवयीनें आरशांत आपलें रूप पाहते. पण काय आश्चर्य ? आरशांत तिचें प्रतिबिंबच दिसत नाहीं ! ईव्ह हा चमत्कार पाहून चकित होते. इतक्यांत तिच्यामागें रोझ येऊन उभी राहते. तिच्या हातांत एक हॅट आणि बॅग आहे. आरशाजवळ येण्याच्या गडबडीत रोझ ईव्हच्या शरीरांतून आरपार निघून जाते. आरशांत पाहून ती हॅट घालूं लागते. ईव्ह आणि रोझ–दोघीहि आरशासमोर उभ्या आहेत. पण फक्त रोझचेंच प्रतिबिंब आरशांत उमटलें आहे. हा चमत्कार पाहून ईव्ह विस्मयानें थक्क होते.

रोझ हॅट मनासारखी घालून होताच बॅग उचलते, आणि पोर्चच्या पायऱ्या उतरून घाईनें निघून जाते. ईव्ह पुन्हां एकटीच आरशासमोर प्रतिबिंबाशिवाय उभी आहे.

पुन्हां तिच्या कानांत एक अज्ञात आवाज घुमूं लागतो. गोंधळलेल्या मनःस्थितींत किंचित खांदे उडवून ईव्ह बाहेर पडते.

## एका रस्त्यावर–

एका गजबजलेल्या रस्त्यावरून पॅरी चालला आहे. त्याच्याहि कानांत हळूहळू मोठ्या आणि स्पष्ट आवाजांत शब्द घुमत आहेत.

" ..मृतात्म्यांच्या वसाहतीकडे......मृतात्म्यांच्या कचेरीत.. "

पॅरी रखडत रखडत चालला आहे. पण कोठें ?– तें त्याचें त्यालाच माहीत नाहीं. त्याच्या चालण्यांत रिकामटेकडेपणाचें रेंगाळणें आहे. पण त्याच्या आजूबाजूचीं माणसें भाऊगर्दीत ये जा करीत आहेत......हा फरक त्याच्या नजरेंत भरल्याशिवाय राहत नाही. स्वप्नांत चालल्याप्रमाणें पॅरी निस्तब्धपणें चालला आहे.

त्याच्याकडे कोणाचेंहि लक्ष नाहीं. कोणीहि त्याच्याकडे ढुंकून पाहत नाहीं

पॅरीच्या समोरून येत असलेला एक इसम एकदम हस्तांदोलनासाठीं हात पुढें करीत येतो. पण ते पॅरीसाठी नव्हे, पॅरीच्या मागें उभ्या असलेल्या एका गृहस्थांनीहि आपला हात पुढें केला आहे त्यांच्यासाठीं ! पॅरीच्या शरीरांतून दोघांचे हात आरपार जाऊन एकमेकांस भिडतात. दोघेहि इसम

मोठ्या मजेंत बातचीत करूं लागतात. आणि मग विस्मयानें पॅरी बाजूला होऊन रस्त्यानें चालू लागतो.

काही पावलें तो पुढें गेला असेल नसेल तोच एका बंगल्याच्या दारांत उभें राहून एक माळी पॅरीच्या अंगावर खुशाल पाण्यानें भरलेली बादली फेकून देतो. पॅरी संतापाने थबकून स्वतःचे कपडे न्याहाळतो. पण सारे कपडे कोरडे ठणठणीत आहेत; ओलेपणाचा टिपूसहि नाही. विस्मयचकित होऊन पॅरी पुढें जाऊ लागतो.

पुन्हां पुन्हां त्याच्या कानांत शब्द घुमू लागतात–

"मृतात्म्यांच्या वसाहतीकडे......मृतात्म्याच्या कचेरीकडे......"

पॅरी आणखी काही पावले पुढें जाऊ लागतो. वाटेंत एक वृद्ध गृहस्थ बस्साठी वाट पहात हातांत वर्तमानपत्र घेऊन वाचीत उभे असलेले दिसतात. या सद्गृहस्थांना उद्देशून पॅरी म्हणतो–

"माफ करा, पण......"

पण त्या गृहस्थाचे पॅरीकडे लक्षच नाही. मोठ्या मजेंत वर्तमानपत्र वाचण्यांत तो गुगला आहे. पॅरी पुन्हा विचारतो–

"माफ करा. पण, आपण मृतात्म्याची कचेरी कुठ आहे तें सांगू शकाल काय?"

## सार्वजनिक उद्यानांतील एका कोपऱ्यांत–

ईव्ह एका बाकापाशी येऊन थावली आहे. या बाकावर एक बाई आपल्या मुलाला खेळवीत बसली आहे. ईव्ह प्रसन्नपणें विचारते–

"बाई, मृतात्म्यांची कचेरी कुठं आहे. तें मला सांगू शकाल काय?"

त्या बाईच्या कानी ईव्हचा एक शब्दहि पडल्याचें दिसत नाहीं. बोबड्या बोलांत वांकुल्या दाखवून ती आपल्या छोट्या मुलाला हसवण्यांत मग्न झाली आहे.

**रस्त्यावर–**

वर्तमानपत्र वाचणारे सद्गृहस्थ अजूनहि मजेंत वाचनांत गुगले आहेत. पॅरी किंचित् आवाज चढवून खुलासा करतो–

"मला मृतात्म्यांच्या कचेरींत एक फार महत्त्वाचें काम आहे. पण ती कचेरी नक्की कोठे आहे, तें मला माहीत नाही. म्हणून मी आपल्याला ही तसदी देतों आहें".

सदर वृद्ध गृहस्थ वर्तमानपत्र वाचतां वाचतां खुद्कन् हंसतात. पॅरी हळूंच वर्तमानपत्रांत डोकावून हंसण्यासारखें एवढें काय आहे तें पाहतो, आणि पुटपुटतो–

"काय थेरडा आहे! अहो म्हातारबुवा–"

तो वृद्ध गृहस्थ पूर्वीपेक्षां अधिकच मोठ्यानें हंसू लागतो. तेवढ्यांत एक बस् येऊन तेथें थांबते. वृद्ध गृहस्थ वर्तमानपत्राची घडी करून खिशांत घालतो आणि बस्मध्यें चढतो. बस् क्षणार्धांत निघून जाते. पॅरी पुढें चालूं लागतो. जातां जातां मध्येंच तो थबकतो. बाजूला एक लहानसा आडवा रस्ता गेलेला आहे. तो त्याच्या दृष्टीला पडतो. त्या रस्त्याच्या दोन्ही बाजूला उंच राखी रंगाच्या भिंती आहेत. आणि कांहीं थोडीं माणसें, दूरवर रस्त्याच्या कडेला दिसणाऱ्या एका इमारतीसमोर रांगेंत उभीं आहेत. हीं थोडीं माणसें सोडलीं तर बाकी हा सबंध रस्ता निर्मनुष्य आहे. पॅरी या रस्त्यानें जाऊं लागतो. हा रस्ता पाहून त्याला विलक्षण अचंबा वाटत आहे. मध्येंच त्याची नजर वर जाते आणि एका पाटीवर खिळते. त्या पाटीवर तो वाचतो–"मृतात्म्यांची वसाहत......मृतात्म्यांच्या कचेरी-कडे......" पॅरी हळू हळू त्या रांगेच्या दिशेनें चालू लागतो.

त्या विचित्र रस्त्याच्या दुसऱ्या टोंकाला असलेल्या एका भव्य इमारतीसमोर वीस पंचवीस माणसें दोन रांगा धरून उभीं आहेत. या रांगेंत सर्व दर्जाचीं, सर्व धर्मांचीं आणि निरनिराळ्या वयाचीं माणसें दाटीवाटीनें आपला मार्ग काढीत उभीं आहेत. एक कामगार, एक म्हातारी बाई, एक

नटून थटून आलेली देखणी तरुणी, एक सैनिक, एक गुलछबू तरुण, पाठ जमिनीला टेकलेला एक वृद्ध आणि अशी कितीतरी माणसें रागेंत तिष्ठत उभीं आहेत. रांगेच्या शेवटीं पॅरी ड्यूमेन येऊन उभा राहिला आहे.

या इमारतीचें दर्शनी दालन काय तें न्याहाळतां येतें. बाकी आतील दालनें अंधारलेली आहेत. आंत काय गौडबंगाल आहे याचा बाहेर कोणालाहि पत्ता नाही. क्षणभरानें इमारतीचें दार करकरत उघडतें– आणि त्याच वेळीं एक घंटा किणकिणल्याचा ध्वनि ऐकू येतो. रागेच्या तोंडाशी उभा असलेला इसम या द्वारानें आंत अदृश्य होतो. आणि दार पुन्हा बंद होतें.

मागून कोठून तरी जड पावलानें ईव्ह येते. आणि रांगेच्या शेवटीं उभें राहण्याचें सोडून ती सरळ माणसांच्या अंगावरून रांगेच्या तोंडाकडे जाऊं लागते. त्याबरोबर रांगेंतील तक्रारखोर माणसें एकदम गिल्ला करतात.

" ओळीत या ! ओळींत या ! " कांहीं आवाज.

" ही बाई स्वतःला समजते तरी कोण ? " दुसरा एक आवाज.

" हा शिष्टपणा कसला ? " आणखी एक आवाज–

" आम्हां सर्वांपेक्षां याच बाईला अशी काय घाई झाली आहे, आंत जाण्याची ? "

ईव्ह शांतपणें वळून, हीं सारी मुक्ताफळें ऐकून उद्गारते– " हूं !– निदान तुम्ही तरी मला पाहूं शकतां म्हणायचें ! तुम्हीं सारींच कांहीं सभ्य माणसें आहांत असें दिसत नाहीं ! पण आहे त्यांत मला समाधान मानलें पाहिजे– "

" आम्ही तुला पाहूं शकतों म्हणजे ? शंका आहे काय ? " एक लठ्ठ बाई गुरगुरत म्हणते– " मुकाट्यानें रांगेंत जाऊन आपली जागा धरून राहा. राणी असलीस तर आपल्या घरची...... "

या गलबल्यांत फक्त पॅरीच तेवढा स्तब्ध आहे. तो टक लावून ईव्हकडे पहात राहिला आहे.

पुन्हा दार करकरते, घंटा किणकिणते– आणि स्त्रीपुरुषाची रांग आणखी कांही पावलें पुढें सरकते. ईव्ह मुकाट्यानें पॅरीच्या मागें येऊन उभी राहते. ती चालत असतांना पॅरीची नजर तिच्यावर खिळून राहिली आहे.

हळू हळू ही रांग वर सरकत जाते. अखेर पॅरी दाराशी येऊन पोंचतो. दाराच्या तावदानांतून आत डोकावतो. दर्शनी दालनांत धुळ-कटलेली कौटर्स आणि शेल्व्हज् याची मांडामांड सहज दिसू शकते. या सामानाशिवाय आत कोणाच्या अस्तित्वाची साक्ष नाही. दार करकरतें. घंटा किणकिणते. आणि पॅरी उघड्या दारांतून आंत प्रवेशतो. दर्शनी दालनातून तो आणखी एका दरवाजानें अन्तर्दालनांत प्रवेशतो......

## अन्तर्दालनांत--

पॅरी अन्तर्दालनांत प्रवेशतो. मृतात्म्यांच्या वसाहतीतील हीच ती मृतात्म्यांची कचेरी ! समोर एका प्रशस्त मेजापाशी एक प्रौढ स्त्री धीर-गंभीरपणे बसलेली आहे. तिच्या समोर एक दिवा मंदपणें तेवत आहे. त्या मंद प्रकाशात त्या अंधाऱ्या दालनांतील साऱ्या वस्तु उजळल्या आहेत. या दालनाच्या भिंती, मोठमोठ्या तसबिरी, रंगीत चित्रें आणि रेखीव शिल्पाकृति यांनी सजविलेल्या आहेत. मृतात्म्यांच्या कचेरीला शोभेलशी जीर्ण जुनाट पण भव्य सजावट या दालनांत दिसते.

पॅरी मेजापाशी जाऊन नम्रपणें विचारतो–

"माफ करा– पण आपणच मला भेटीला बोलावलं आहे काय ?"

मेजावर बसलेली स्थूल नि प्रौढ स्त्री धीरगंभीरपणे एका, खातेवही-प्रमाणें दिसणाऱ्या जाडजूड नि प्रचंड पुस्तकात काही नोंदी करण्यांत गुतली आहे. त्या शेजारीच एक काळा बोका अंग वेटाळून बसलेला आहे. आपला जाड भिंगाचा चष्मा किंचित् वर करून ही प्रौढ स्त्री एकदां पॅरीला नीट न्याहाळते आणि स्मित करून म्हणते–

"होय– या ! मीच तुम्हाला बोलावलं आहें !"

पॅरी मेजावरील बोवयाला लडिवाळपणें गोंजारीत विचारतो–

“ मग माझं काय काम आहे, ते मला आपण सागाल काय ?”

“ मी काही तुम्हांला फार वेळ तिष्ठत ठेवणार नाही. या कांहीं ठराविक नोंदी वेळच्या वेळी झाल्याच पाहिजेत–म्हणून......” असें कांहीं पुटपुटून ही बाई त्या जाडजूड खातेवहीत लक्ष घालते. काही नोंदी तपासत ती मान वर न करतांच विचारते–“ तुम्हीच पॅरी ड्यूमेन्! होय ना?”

“ होय–मीच तो ” पॅरी विस्मयानं उत्तरतो. “ पण......”

शांतपणें बाई खातेवहीची पानं पुटपुटत चाळू लागते–

“ डा......डि......डी......डु......डू......ह! ड्यूमेन! सांपडलं पान–जन्म १९१२ मधील! होय ना ?”

पॅरी थक्क होऊन पहातच राहतो–बाई पुढे वाचू लागते–

“ तुम्ही एका कारखान्यांत फोरमन्च्या हुद्द्यावर होता–नव्हे काय?”

“ होय–! ”

“ आणि आज सकाळी साडेदहा वाजतां तुमचा खून करण्यात आला–होय ना ?”

“ खून ?–” पॅरीला आश्चर्याचा धक्काच बसतो. कितीतरी वेळ तो स्वतःशीच तोच तो शब्द पुटपुटतो. आणि डोके खाजवीत बावचळल्या-प्रमाणें मुद्रा करून तो विचारमग्न होतो. बाई त्याच्याकडे पाहून मधुर स्मित करते. मग एकाएकी कांही उलगडा झाल्यासारखें हंसून पॅरी उद्गारतो–

“ अस्सं होय! अशी भानगड आहे तर! एकूण मी मेलेलों आहें......तरीच......” एकाएकीं त्याला कसली तरी आठवण होऊन तो प्रसन्नपणें विचारतो–“ पण खून ? माझा खून कोणी केला ?”

बाई चष्मा डोळ्यावर ओढून खातेपुस्तकांतील नोंदी तपासते आणि उत्तरते–

“ त्या माणसाचं नांव ल्यूसीन......”

" अस्सं–तो बदमाश पोरटा होय! बेटचानं नेमकी वेळ साधली खरी!" असें म्हणून पॅरी पुन्हा हंसतो.

बाई समाधानानें स्मित करीत म्हणते–

" छान! असाच समजूतदारपणा दाखवावयाला हवा माणसानं! इथं येणारा प्रत्येक माणूस जर मृत्यूबद्दल असाच समजूतदारपणा दाखवील तर माझं काम किती सोपं होईल–!"

" पण स्वतःच्या मृत्यूसाठीं माणसांनी येवढी खळखळ कां करावी?" पॅरी विस्मयाने विचारतो.

" आपल्या हातांत नसलेल्या बाबतींत अकारण दुःखी कष्टी होण्याचा कांही माणसांचा स्वभावधर्मच असतो!" बाई उत्तरते.

" ऊं!–मी कांही त्यांच्यापैकी नाहीं–" पॅरी खांदे उडवून म्हणतो– " माझ्या मागें रडायला बायकापोरं कोणी नाहीत. मला कसलीहि काळजी नाही".

पॅरी अस्वस्थतेनं दालनांत येरझारा घालू लागतो.

विचारमग्नतेनं तो पुन्हां म्हणतो–

" आणि शिवाय आयुष्यांत ज्या कार्यासाठी जगायचं तें कार्य माणसानं केलं असलं म्हणजे मग तर मृत्यूला कांहीच भ्यायचं कारण नाही!" असं म्हणून तो आत्मविश्वासानं त्या स्त्रीकडं नजर टाकतो. चष्मा वर सरकवून बाई त्याच्याकडं दयेनं पाहूं लागते–

पॅरी विचारतो– " मी म्हणतो तें तुम्हांला पटतं ना?"

बाई भानावर येऊन म्हणते– " मी काय सांगणार? मी बोलून चालून हुकुमाची ताबेदार!–"

उत्तराची टाळाटाळ करून बाई पुन्हां खातेवहींत पहात म्हणते–

" तुम्ही कृपा करून इथं या जागी सही कराल काय?"

क्षणभर पॅरी गोंधळतो. मग मेजाजवळ जाऊन त्या खातेपुस्तकांतील एका पानावर बाईनी दाखविलेल्या जागीं तो सही करतो.

" छान! आतां तुम्ही खरेखुरे मेलां आहांत!"

पॅरी बावचळून पाहूं लागतो. मग तो निघण्याच्या तयारीनें विचारतो– "आतां मी कुठं जाऊं?"

बाई विस्मयानं त्याच्याकडे दृष्टिक्षेप टाकीत म्हणते–

"कुठें म्हणजे? वाटेल तिकडे जाऊं शकतां तुम्ही!"

–पण पॅरी मागें वळून आंत आलेल्या दारानेंच बाहेर पडू लागतांच बाई एकदम् ओरडते–

"अ‌ू हूं– त्या दाराने तुम्हांला जाता येणार नाही. या दुसऱ्या दारानें तुम्हांला जावें लागेल......"

बाईनी दाखविलेल्या दाराने पॅरी बाहेर पडतो. ती प्रौढ स्त्री चष्म्यातून बाहेर जाणाऱ्या पॅरीकडे पुन्हां एकदां दृष्टिक्षेप टाकते– आणि मग खातेंपुस्तकांतील नवें पान उघडून नव्या नोंदी न्याहाळत हातानें घंटेची दोरी ओढू लागते. दूरवर दार करकरते. घंटा किणकिणते......

## रस्त्यावर–

त्या भव्य जुनाट इमारतीच्या एका दिडी दरवाजांतून पॅरी नुक्ताच बाहेर पडला आहे. खिशांत हात घालून आजूबाजूला न्याहाळत आपण नक्की कोठें उभे आहोंत, याचा तो अदमास घेत आहे. सभोवतालचें दृश्य पाहून त्याला फार मौज वाटत आहे.

पॅरी जिथें उभा आहे, तो रस्ता थोड्याच अंतरावर एका गजबजलेल्या चौकांत जाऊन मिळतो. या चौकांत माणसाची आणि वाहनांची खेंचाखेंच झालेली आहे. पण या मधल्याच रस्त्यावर मात्र मृतात्म्यानीं गर्दी केली आहे. त्यापैकी काही मृतात्मे गंमत पहात आरामशीरपणें मोक्याच्या जागा गांठून बसले आहेत, तर कांही रेंगाळत कोठेंतरी भटकत फिरत आहेत.

मागील कांहीं शतकांतील दोनतीन मृतात्मे तत्कालीन पोशाखांत या रस्त्यांतून हिंडत असतां, पॅरी त्यांच्या दृष्टीला पडतो. आपसांत कुजबुजत ते सर्व पॅरीकडे रोखून पाहूं लागतात.

पॅरी संथपणें चालला असतांनाच गंभीर आवाजांतले शब्द त्याच्या कानी पडतात, "सुस्वागतम्! आमच्यांत आपण आलेले पाहून आम्हांस फार आनंद होत आहे." पॅरी चमकून वळून पाहतो. कांही माणसें त्याला उद्देशून बोलत असलेली त्याच्या दृष्टीस पडतात. कोणी झुजार वीर, कोणी भाबडे प्रेमिक, कोणी आधुनिक तर कोणी पुराणपुरुष! आणि तेहि एकाच युगांतले नव्हत! अनेक शतकातील तऱ्हतऱ्हेच्या पोशाखातील मृतात्म्यांचें जणू येथें प्रदर्शनच भरलेलें आहे. अठराव्या शतकांतील एक प्रेमळ म्हातारा त्याला मायेने पुसतो–

"आपण नुकतेच आलेले दिसतां? होय ना?"

"होय........आणि तुम्ही?"

"मला १७७८ मधें फाशी देण्यांत आले!" म्हाताऱ्याच्या या उत्तरावर पॅरी त्याजकडे एक करुणार्द्र दृष्टि टाकतांच तो घाईघाईनें खुलासा करतो–

"म्हणजे त्यांत माझा कांही गुन्हा नव्हता. केवळ कायदेपंडितांच्या चुकीमुळें मला देहान्ताची सजा मिळाली होती. पण ही कांही महत्त्वाची बाबत नाही. केव्हांतरी प्रत्येकाला इथे यावयाचेंच असते. जरा पुढे मागें इतकेच! तुम्हांला कांही विशेष कामें नाहीत ना?–"

पॅरी विस्मयानें पाहूं लागताच तो म्हातारा पुढे बोलतो–

"होय–म्हणजे तुमच्या पत्नीला खरोखरीच तुमच्या मृत्यूमुळें कितपत दुःख झालें आहे; तुमच्याशी ती बेईमान झाली आहे की काय? तुमच्या मुलाबाळांनी किती आकांत मांडला आहे; किंवा तुमच्या मृत देहाचा दफन-विधि थाटामाटांत चालला आहे की नाही–असल्या कांहीं गोष्टी तुम्हाला पहावयाच्या असतील तर......"

पॅरी मधेंच त्यास अडवून म्हणतो– "छे, छे! त्याची कांही जरुरी नाहीं. माझ्याशिवाय सर्वच सारें कांहीं सुरळीत चाललें असेल याची मला खात्री आहे!"

"फारच उत्तम! मग मी तुमचा वाटाड्या म्हणून तुमच्याबरोबर येऊं काय– ?"

"आपण घेत असलेल्या तसदीबद्दल मी तुमचा फार आभारी आहे!" पॅरी नम्रपणें उत्तरतो. पण तो म्हातारा लगेच पुन्हां म्हणतो–

"छे, छे. यांत कसली तसदी? इथे आम्हा जुन्या मृतात्म्याना तरी दुसरा उद्योग आहे कसला? तुमच्या सारखी काहीं नवी माणसें आलीं म्हणजे त्याना या नव्या अवस्थेशी रुळवून देण्यात तेवढाच आमचा वेळ जातो. जिवाला तेवढाच विरंगुळा!"

बोलत बोलत पॅरी त्या वृद्ध गृहस्थाबरोबर चौकांत येऊन पोंचतो. चौकांतील वर्दळ पाहून त्याला भारी मौज वाटते. खिशांत हात घालून शीळ घालीत तो मजेत गंमत पहात उभा राहिला आहे. जिवंत माणसे आणि मृतात्मे यांनी गजबजलेला तो चौक म्हणजे एक अजबखाना बनून राहिला आहे. मृतात्मे आपआपल्या शतकांतील, पण किंचित् जुनाट झालेल्या पोशाखांत वावरत आहेत.

जिवत माणसांची घाईघाईने येजा चालली आहे तर सर्व मृतात्मे कष्टी मुद्रेने आणि शरमिंदेपणानें उगीचच रेंगाळत चालले आहेत. त्यापैकीं कित्येक तर रिकामटेकडेपणानें जागजागीं तिष्ठत उभे राहिले आहेत, अगर ठिय्या देऊन बसले आहेत.

"काय विलक्षण गर्दी झाली आहे इथें!" पॅरी उद्गारतो.

"छे, छे! तशी कांहीं विशेष नाही! नेहमींचीच आहे!" म्हातारा उत्तरतो– "पण आतां तुमचें नांव नोंदवलें गेलें असल्यामुळें, तुम्ही जिवंत माणसांच्या जोडीला मृतात्मेहि पाहूं शकत आहांत."

"जिवंत माणसापासून तुम्ही मृतात्मे वेगळे कसे ओळखून काढतां?" पॅरी उत्सुकतेनें विचारतो.

"फारच सोपी आहे गोष्ट ती! जीं माणसें सारखीं कसल्यातरी घाईत आणि लगबगींत दिसतात– तीं जिवंत माणसें म्हणून ओळखावें!"

अितक्यांत समोरून खाकोटींत एक कातडी बॅग घेऊन घाईघाईनें जाणाऱ्या एका इसमाकडे त्या म्हाताऱ्याचें लक्ष जातें; आणि त्याकडे

बोट दाखवून तो म्हणून–" उदा. हाच इसम पहा. हा नक्कीच जिवंत इसम असला पाहिजे !"

सदर गृहस्थ या दोघांच्या इतक्या जवळून चालला आहे, कीं जर तो मेलेला असता तर या म्हाताऱ्याचे उद्गार त्यानें खात्रीनें ऐकले असते, पॅरीला या प्रकारची मोठी गंमत वाटते. आणि मग तो जिवंत माणसे आणि मृतात्मे आपण होऊन ओळखण्याचा प्रयत्न करूं सागतो. या प्रकारच्या क्रीडेंत त्याला मौज वाटू लागते. पण हें ओळखण्याचें कसब त्याला इतक्या सहजासहजीं साध्य होत नाहीं. खालीं मान घालून शांतपणे पावलें टाकीत जाणाऱ्या एका स्त्रीला चुकून तो मृतात्म्यांच्या सदरांत ढकलतो. पण म्हातारा त्याची चूक दुरुस्त करतो. जिवंत माणसें आणि मृतात्मे एकमेकांपासून वेगळी काढणें वाटते तितके सोपें नाही हें पॅरीच्या लक्षांत येतें; त्याची मुद्रा अधिकच त्रासिक होते. तें पाहून त्याचा वृद्ध वाटाड्या ममतेनें म्हणतो––

" नाउमेद होण्याचं कारण नाहीं! संवयीनें तुम्हालाहि जमेल हळू हळू!"

बोलत बोलत पॅरी आणि त्याचा वृद्ध वाटाड्या आणखी थोडें पुढें येतात. तोंच समोरून मिरवणुकीप्रमाणे मृतात्म्याचा एक समुदाय येतांना त्यांना दिसतो. आणि दोघेहि थबकतात. या मिरवणुकीच्या अग्रभागीं एक जिवंत आणि भंपक सरदारपुत्र मोठ्या थाटामाटानें गाडींतून मिरवीत चालला आहे. त्याच्या मागें त्याच्या मृत पूर्वजांची रांगच रांग लागली आहे. मध्य युगापासून ते एकोणीसाव्या शतकापर्यंतचे या सरदार घराण्यांतले सारे पुरुषश्रेष्ठ या मिरवणुकीत छाती पुढें काढून सामील झाले आहेत.

मधेंच या सरदार पुत्राची गाडी थांबते. साहेबमजकूर सिगरेट शिलगावण्यासाठीं थबकतात. त्यांच्या मागोमाग पूर्वजांची मिरवणूकहि खडी राहते. आपल्या लाडक्या वंशजाची प्रत्येक बारीक सारीक हालचाल ते मोठ्या उत्सुकतेनें न्याहाळीत आहेत.

पॅरी विस्मयानें विचारतो– " हा काय प्रकार आहे? ही सर्कस तर नव्हे?"

पॅरीचे शद्ब ऐकून त्या सरदारपुत्राचे अभिमानी पूर्वज त्याच्याकडे तिरस्काराचा कटाक्ष टाकतात. पॅरीचा वृद्ध वाटाड्या खुलासा करतो– "फार मोठ्या सरदार घराण्यांतला हा वंशज आहे. त्याचे हे पूर्वज मृतात्मे, तो जाईल तिकडे सांवलीसारखे त्याच्या मागें असतात."

"पण ही सारी कशासाठीं यातायात? हा प्राणी कांहीं इतका अभिमान बाळगण्यासारखा कर्तृत्वाचा खास नाही!"

"ही पूर्वजांची फौज या वंशजाच्या मृत्यूची वाट पहात आहे. तो मेल्यावर त्यांचें त्यांच्याबद्दल काय मत झालें आहे, ते ही मंडळी त्याला सांगू शकतील!"

सरदार पुत्र सिगरेट शिलगावतो–आणि पुन्हां डामडौलांत त्याची गाडी चालू लागते. त्याचे सारे पूर्वज त्याच्याकडे आपली अगतिक दृष्टि खिळवून त्याच्या मागोमाग पुन्हां चालू लागतात.

पॅरी आणि त्याचा वृद्ध वाटाड्या पुन्हां रस्त्यानें भटकू लागतात. तेवढ्यांत एक बग्गी चौखूर धांवत येते–आणि त्या म्हाताऱ्याच्या आगावरून जाते. म्हातारा शांत उभा आहे. त्याला तिळमात्रहि इजा पोचत नाहीं. भाबडेपणानें पॅरी मात्र झटकन् उडी मारून बग्गीच्या वाटेंतून दूर होतो. त्याचा हा बावळेपणा पाहून तो म्हातारा हंसू लागतो. पॅरीला त्याच्या हंसण्याचा अर्थ उमजून तो खजील होतो–

म्हातारा मायाळूपणानें म्हणतो– "होईल......हळू हळू असल्या प्रकारांची तुम्हांला चांगली संवय होईल......जरा रुळलात या अवस्थेला, कीं मग कांही जड जाणार नाहीं......"

## पुन्हा अन्तर्दालनांत–

ईव्ह, त्या प्रौढ स्त्रीच्या मेजासमोर खुर्चीवर बसली आहे. तिची मुद्रा चिंताक्रांत दिसत आहे. आपला प्रक्षोभ लपवीत ती विचारते–

"तुम्हांला खात्री आहे?"

बाई मधुर स्मित करीत शांतपणें उत्तरते–

"यात चूक होण्याचा मुळी संभवच नाही. नोकरीच्या बाबतींत अशा चुका करून कसें चालेल?"

ईव्ह पुन्हा विचारते–

"त्यान मला विषप्रयोग केला काय?"

"होय बाईसाहेब!"

"पण का? मी काय अपराध केला होता त्याचा?"

"तुम्ही त्याच्या मार्गात येत होता." बाई निर्विकारपणें उत्तरतात– "त्याला तुमची संपत्ति हवी होती, ती त्याला मिळाली. आता त्याला तुमच्या बहिणीला लुबाडायच आहे."

ईव्हच्या प्रक्षोभ अनावर होतो. असहाय आणि अगतिकपणें ती मान खाली घालून पुटपुटते–" आणि ल्युसेटाहि त्याच्यासाठी वेडी झाली आहे."

बाई अनुकपेनें तिच्याकडे दृष्टि टाकत म्हणते–

"तुमच्या दुःखात मी सहभागी आहे......पण या जागीं तुम्ही सही कराल काय?"

ईव्ह यांत्रिकपणें उठते आणि खातें पुस्तकावर दर्शविलेल्या जागी सही करते.

"छान!" बाई म्हणते– "आतां तुम्ही अधिकृतरीत्या मेलेल्या आहांत!"

ईव्ह क्षणभर घोटाळते आणि मग विचारते–

"पण आतां मी कुठं जाऊं?"

"तुमच्या मनाला येईल तिकडे कोठेंहि. मृतात्म्यांना नेहमीच स्वातंत्र्य असतें!"

पॅरीप्रमाणेंच ईव्ह देखील यांत्रिकपणें आलेल्या दरवाजांतूनच बाहेर पडूं लागते. पण इतक्यांत ती प्रौढ स्त्री तिला थांबवीत म्हणते–

"ऊं हूं! त्या दरवाजानें नाहीं......या इकडून!"

ईव्ह विचारमग्न मुद्रेनें अंतर्दालनांतून बाहेर पडते.

## रस्त्यावर–

ईव्ह कष्टी मुद्रेनें रस्त्यावरून चालली आहे. तिची नजर भूमीवर खिळली आहे. तिचे हात पायघोळ गाऊनच्या खिशामध्यें आहेत. रस्त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्या माणसांकडे तिचे लक्ष नाही. जिवंत माणसें आणि मृतात्मे–सर्वांच्याबद्दल ती उदासीन आहे. रस्त्यावरच खेळ मांडणाऱ्या एका गारुड्याकडे एकदम तिचें लक्ष जातें.

तो गारुडी तारस्वरांत ओरडत आहे– "ऐका हो ऐका! आणखी थोडे पैसे द्याल तर चमत्कार पहाल! हा माझा पठ्ठ्या एका हातानें अडीचशें पौंडांचें वजन उचलून तुमच्या डोळ्यांचें पारणें फेडील......" असें बोलत तो आपल्या शेजारच्या एका उग्र मिशाळ पहिलवानाकडे बोट दाखवतो. तो ताकदवान् इसम जमलेल्या गर्दीतील माणसांना मुजरा करूं लागतो. आजूबाजूला बघ्यांची गर्दी वाढूं लागते.

ईव्हची पावलें थबकतात. ती दुरूनच गंमत बघूं लागते. गर्दीच्या कडेला पॅरी आणि त्याचा म्हातारा वाटाड्या येऊन नुकतेच उभे राहिले आहेत. म्हातारा, पॅरीला ढोसत म्हणतो,–"चला–हा खेळ पाहण्यापेक्षां आपण आमच्या मंडळांत जाऊं या–"

" नको–! आपण इथेच थांबूया–" पॅरी म्हणतो, "शक्तीचे प्रयोग पाहणें मला फार आवडते!"

गारुडी तारस्वरांत ओरडून बघ्याच्या गर्दीतून पैसा उकळण्यांत मग्न आहे. शक्तीचे प्रयोग दाखविण्यास पहिलवान सिद्ध होऊन बसला आहे.

तेवढ्यात एक दहा बारा वर्षांची छोकरी हातांत एक टोपली घेऊन गर्दीत शिरून खेळ पाहण्यास उभी राहिलेली ईव्हला दिसते. तिच्या टोपलीत दुधाची चरवी आणि एक पैशाची पिशवी असावी हें कोणालाहि सहज दिसण्यासारखें आहे. बाजारहाट करण्यासाठी कोणी तरी तिला पाठवलें असलें पाहिजे. ईव्ह तिला न्याहाळून पहात असतांनाच, एक छटेल मवाली त्या मुलीच्या मागें चोरपावलानीं येऊन उभा असलेला ईव्हच्या

नजरेस पडतो. इकडे तिकडे चाहूल घेऊन, खेळ पहाण्यांत रमलेल्या त्या छोकरीच्या टोपलीतून तो मवाली अलगद पैशाची पिशवी काढू लागतो.

त्या बरोबर ईव्ह ओरडते– "ए छोकरी......तो पहा......तो पहा, बदमाश तुझी पैशाची पिशवी चोरतो आहे !"

पॅरी चटकन् वळून ईव्हकडे पाहतो–आणि मग त्या दुर्दैवी मुलीकडे त्याची नजर जाते. ईव्ह आणि पॅरी एकमेकांकडे पाहतात, ईव्ह पॅरीला ओरडून म्हणते–

"पकडा, पकडा त्या चोराला !"

म्हातारा वाटाड्या अनुकंपेनें हंसूं लागतो. पैशाची पिशवी चोरणारा मवाली शांतपणें आपला कार्यभाग उरकून मागल्या पावलीं पळ काढतो.

ईव्ह कंठशोष करून किंचाळते– "चोर......चोर"

ईव्हची तारांबळ पाहून पॅरीला मौज वाटते. म्हातारा वाटाड्या हलकेंच उद्गारतो–

"ही बाई देखील नुक्तीच येथें आलेली दिसते !"

"असें दिसतें आहे खरें !" पॅरी म्हणतो– "तिला अजून बऱ्याच गोष्टींचा उमज पडायचा आहे !"

ईव्ह त्वेषानें पॅरीकडे वळून म्हणते– "तुम्हांला हंसायला काय झालं ? त्या चोराला तुम्ही कां पकडलें नाही ?"

पॅरी शांतपणें तिला म्हणतो– "या प्रकाराची तुम्ही आतां संवय करून घेतली पाहिजे. उगाच जिवाचा संताप करण्यांत काय अर्थ ?"

"काय म्हणालांत ?" ईव्ह विस्मयानें म्हणते– "कसली संवय करून घेतली पाहिजे ?" असें म्हणून ती त्या दोघांच्या मुद्रेवरील भाव न्याहाळूं लागते. आणि मग तिला त्यांच्या बोलण्याचा एकाएकीं उमज पडतो. तिची मुद्रा दु:खीकष्टी होते.

क्षणभर पॅरी आणि ईव्ह एकमेकांकडे कुतूहलानें पहात राहतात मग त्यांची नजर पुन्हां त्या मुलीकडे वळते. घाबरी घुबरी होऊन ती पैशाची

पिशवी शोधू लागली आहे. तिचे ओठ थरथरूं लागतात. डोळयांत अश्रू दाटतात–आणि अखेर ती एका बाकावर बसून उमसून रडू लागते.

ईव्ह, पॅरी आणि त्याचा म्हातारा वाटाड्या या सर्वांची सहृदयता आता पुष्कळच गारठली असल्याने ते केवळ अनुकंपेनें तिजकडे पहात राहतात.

" गरीब विचारी!" पॅरी उद्गारतो "आतां घरी गेल्यावर विनाकारण बिचारीचा छळ सुरू होईल!"

आणि मग पहिल्या प्रथमच त्याच्या तोंडून अति कडवट उद्गार निघतात.

" असं आहे हें! आणि हें असंच चालायचं!"

"असच चालायचं?" ईव्ह कटुपणानें खोचून विचारते– "तुम्ही देखील 'असंच चालायचं' म्हणून स्वस्थ राहणार?"

" मग मी काय करावं अशी आपली अपेक्षा आहे बाईसाहेब?" पॅरी आपला प्रक्षोभ उपरोधाच्या आवरणाखालीं दडवीत विचारतो.

ईव्हला उमजते. तिची मुद्रा पडते. ती पुटपुटते–

" आपण कोणासाठी कांहींच करूं शकत नाही हेंच खरें!"

उमसून रडणाऱ्या त्या मुलीकडे एक करुण दृष्टि टाकून ती म्हणते– " उघड्या डोळयानं असल्या गोष्टी पाहूनहि आपल्याला कांही करतां येऊं नये! किती भयंकर आहे ही अवस्था!"

ईव्ह आणि पॅरी स्वतःच्या मनांतली खळबळ दडवीत एकमेकांकडे पाहतात.

" चला जाऊं या आपण–" म्हातारा पॅरीच्या खांद्यावर हात ठेवीत म्हणतो.

ईव्ह कष्टी मनानें पुन्हा गाऊनच्या खिशांत हात घालून खालीं मान घालून दुसरीकडे जाऊं लागते.

## राजप्रासादांत–

पॅरी आणि त्याचा वाटाड्या राजप्रासादाच्या वेशीपाशीं आले आहेत. दारावर नागव्या संगीनींचा पहारा करणारे सैनिक उभे आहेत. पॅरी राज-

प्रासादाचें वैभव न्याहाळीत उद्‌गारतो–

"अस्स! एकूण हाच तो राजप्रासाद तर!"

"काय म्हणालांत?"

"गेली कित्येक वर्षे मी बादशहाला पाहण्यासाठी धडपडत आहे."

"कोणाला? बादशहाला?" विस्मयचकित मुद्रेने म्हातारा म्हणतो– "बादशहाला पाहण्यासाठी तुम्ही धडपडत होतां? मौज आहे झालं! त्याला पाहण्यासारखं आहे काय? एक मूर्ख दुर्दैवी जुलमी सत्ताधीश आहे तो, इतकेच!"

"पण मला त्याच्याबद्दल उत्सुकता वाटते."

आपले खादे उडवीत म्हातारा उत्तरतो–

"तसं असेल तर चला, आंत जाऊं आपण!"

म्हाताऱ्याच्या पाठोपाठ पॅरी द्वाररक्षकांच्या अंगावरून राजप्रासादांत जाऊं लागतो. जातां जातां एका द्वाररक्षकाला उद्देशून तो म्हणतो– "तुमच्या नाकावर टिच्चून आत कोण चाललंय याची तुम्हांला कल्पना तरी आहे का?"

राजप्रसादाच्या अनेक अन्तर्दालनांचा पॅरीला म्हातारा परिचय करून देतो. प्रत्येक दालनांत मृतात्म्याची गर्दी उसळली आहे. तऱ्हतऱ्हेच्या पोशाखातले आणि वेगवेगळ्या काळांतले मृतात्मे कष्टी मुद्रेने उगाच इकडून तिकडे रेंगाळत आहेत. पॅरी कौतुकानें राजप्रासाद न्याहाळीत आहे. पॅरी आणि त्याचा म्हातारा वाटाड्या बादशहाच्या खास दालनापाशी येऊन पोहोंचतात. बादशहाचा एक खास नोकर हातात बादशहाचे चकचकीत बूट घेऊन दालनांत प्रवेश करूं लागतो. त्याबरोबर पॅरी आणि म्हातारा, हे दोघेहि घाईघाईनें त्याच्या मागोमाग आत शिरतात. त्यांच्या मागें द्वार-रक्षक दार बंद करून घेतात. क्षणभर पॅरी आणि तो म्हातारा खोलीच्या मध्यभागीं येऊन सभोंवतालचें डोळे दिपवणारें वैभव न्याहाळू लागतात. खोलीच्या मध्यभागीं मांडलेल्या मखमली शय्येवर बादशहा पोशाख करीत

बसला आहे. त्याच्या अंगावर कांहीं चलाख नोकर–चाकर कपडे चढवीत आहेत. बादशहाच्या तोंडांत एक लठ्ठ चिरूट जळत आहे. बादशहा अंगापिंडानें चांगला दणकट आणि देखणा आहे. त्याच्या मुद्रेवर क्रूर आणि करारीपणा विराजत आहे. हातांत बूट घेऊन आंत येणारा नोकर मोठ्या अदबीने बादशहाच्या पायांत बूट चढवू लागतो. या दालनांत बादशहाच्या आसपास पांच पंचवीस मृतात्मे बसलेले आहेत. त्यापैकी कांहीं आराम खुर्चीवर लवंडले आहेत, तर कांहीं बादशहाच्या प्रशस्त पलंगावर पसरले आहेत. त्यांपैकीं कोणी सेनापति तर कोणी दिवाण, कोणी खुषमस्करे तर कोणी बादशहाचे पूर्वज, अशा तऱ्हतऱ्हेच्या व्यक्ति या मृतात्म्यांत आहेत. त्यापैकीं प्रत्येक जण बादशहाची प्रत्येक कृति उपहासानें आणि तिरस्कारानें पाहत आहे.

पॅरीला गंमत वाटून तो म्हणतो–" वा ! या बादशहाचा तिरस्कार करणारा मी एकटाच आहें असें नाही." त्याबरोबर साऱ्या मृतात्म्यांचें लक्ष पॅरीकडे लागतें.

पॅरीचा वाटाड्या खुलासा करतो–" बादशहाचे हे नेहमीचेच पाहुणे आहेत !"

" बादशहाचे हे मित्र आहेत काय ? "

त्याबरोबर कपाळाला आंठ्या घालून सारे मृतात्मे डोळे वटारून पॅरीकडे पाहूं लागतात.

म्हातारा घाईघाईनें म्हणतो– " पूर्वी हे लोक बादशहाच्या मित्रपरिवारांत होते."

दरम्यान पायामध्यें बूट घालून झाल्यानंतर बादशहा शय्येवरून उठतो आणि समोर भिंतीवर लावलेल्या एका मोठ्या भव्य आरशासमोर जाऊन उभा राहतो. आरशांत बादशहाचें आपादमस्तक प्रतिबिंब उमटलें आहे.

पॅरी बादशहाच्या भोंवतीं हिंडून, एखादा अजब प्राणी पाहावा तसें, त्याला न्याहाळू लागतो. एक दुय्यम लष्करी अधिकारी, आणि आतां एक

सामान्य मृतात्मा, कपाळाला आंठ्या घालून आपल्या पूर्वीच्या धन्याच्या साऱ्या हालचाली पाहत उभा आहे.

बादशहा मिशीवर ताव देत, मोठ्या खुषीत आरशांतील आपली सुरत न्याहाळण्यांत मग्न झाला आहे. आपला पोशाख, आपलें रूप, आपले हावभाव, इतराना हास्यास्पद वाटतील अशा रीतीनें तो पाहत आहे. बादशहाचा एक नोकर एक मूल्यवान् जाकीट घेऊन बादशहाच्या मागें उभा आहे. बादशहा नोकरांच्या मदतीनें अंगांत तें जाकीट चढवू लागतो; आणि मग वर तितकाच मूल्यवान् कोट चढवितो. कमरेला तरवार लटकावण्यापूर्वी, बादशहा आपल्या हातांतील चिरूट टेबलावरील एका चांदीच्या भाड्यांत फेकून देतो.

"माझ्या दाढीच्या भांड्यांत चिरूट?" बादशहाचा एक पूर्वज ओरडतो.

पॅरी या ओरडणाऱ्या मृतात्म्याकडे वळून कौतुकानें विचारतो– "हें भांडें तुमचें आहे का?"

"हे भाडेच काय, हा राजवाडा देखील माझाच आहे! चारशें वर्षापूर्वी मी या देशाचा राजा होतों. त्या वेळी माझ्या प्रत्येक वस्तूला मान दिला जात असे!"

पॅरी उपहासानें हंसून बादशहाकडे बोट दाखवून म्हणतो–

"काळजी करूं नका! लौकरच ही स्वारी देखील आपल्या भेटीला येणार आहे."

मृतात्म्यांतील एकुलती एक स्त्री विस्मयानें विचारते–

"म्हणजे! म्हणतां आहांत तरी काय तुम्ही?"

"उद्यांच या सगळ्या गोष्टीचा निकाल लागणार आहे."

मृतात्म्यांतील एक सेनापति घाईघाईनें येऊन विचारतो–

"कसला निकाल लागणार आहे उद्यां?"

"उद्या या शहरांत बंड होणार आहे!"

"तुम्हांला नक्की ठाऊक आहे?" बाई विचारते.

" नक्की म्हणजे ? मीं स्वतःच या बंडाची आंखणी केली आहे. "

आपल्या गळयांत तऱ्हतऱ्हेचे अलंकार घालणाऱ्या बादशहाकडे बोट दाखवून ती बाई संतापानें म्हणते– " ह्या, ह्या दुष्टामुळें मी तीन वर्षां-पूर्वी मेले, त्याला कोणी फांशी देईल या आशेने रात्रदिवस तेव्हांपासून मी त्याच्याजवळ उभी असते. "

सेनापति थंडपणें म्हणतो– " अजून कांही खात्री देऊं नका! असलीं बंडें नेहमीच यशस्वी होतात असें नाही. त्यांतून हा बादशहा तुम्हांला वाटतो, त्यापेक्षां फार धूर्त आणि कावेबाज आहे...... "

दरम्यान दालनांतील सारे मृतात्मे पॅरी भोंवती जमा झाले आहेत.

सेनापति पुढें म्हणतो– " काळचा डगलेवाल्याचा कट तुमच्या स्मरणांत आहे का ? त्याच्या बुडाशी मी होतों. अगदी कांटेकोर दक्षता घेऊन मी जय्यत तयारी केली होती. पण तें सारे फसलें. बादशहाला कसा सुगावा लागला कोण जाणे ? आम्हींच सारे मात्र त्यांत भरडले गेलों. "

पॅरी त्यावर म्हणतो–" त्यानं माझाहि तसाच निकाल लावला असला पाहिजे ! पण फार उशिरां ! मी एक सांपडलो. परंतु माझे इतर सहकारी कांही त्याच्या तावडींत सांपडणार नाहीत. "

" भलत्याच आत्मविश्वासांत तुम्ही बोलतां आहांत ? " सेनापति म्हणतो.

पॅरी सेनापतीला उत्तरतो– " उगाच नाहीं बोलत मी ! तीन वर्षे कटाचा बेत शिजतो आहे ! इतक्या कांटेकोर दक्षतेनंतर हा कट फसणें अशक्य आहे ! "

" मी देखील असंच म्हणत होतों ! " सेनापती उपरोधानें उद्गारतो.

एक वृद्ध मृतात्मा म्हणतो– " तुम्हां तरुण मृतात्म्यांचें हें नेहमीं असं होतं ! भलभलत्या कल्पना उराशी बाळगून तुम्ही आत्मवंचना करून घेत असतां ! "

खुर्चीवर बसलेल्या या पुराण पुरुषाचें बोलणें संपण्याआधींच एक नोकर खुर्चीसकट त्यास बादशहापुढें नेऊन ठेवतो. बादशहा शांतपणें त्याच्या अंगावर बसतो.

पॅरी मोठ्या त्वेषानें जमलेल्या मृतात्म्यांना म्हणतो–

" तुम्ही अगदींच हातपाय गाळणारे रडे, निराशावादी आहांत ! "

" निराशावादी ?" टेबलावर रेलून उभा असलेला दुय्यम लष्करी अधिकारी म्हणतो, " मीं या माणसाचीं अनेक वर्षे नोकरी केली होती. त्याच्यावर विश्वासानें मान टाकली होती." बोलतां बोलतां हा अधिकारी उठून बादशहाजवळ येतो आणि त्याच्या खुर्चीवर पाय ठेवून त्याच्याकडे बोट दाखवीत बोलू लागतो–" ह्या माणसासाठीं मीं मरण देखील पत्करलें आणि आतां मला कळतें आहे कीं हा ख्यालीखुशालीत आणि विलासांत रात्रंदिवस मग्न झालेला असतो. याची लंबींचवडी भाषणें याच्या खाजगी चिटणिसानें खरडलेलीं असतात ! आणि आरशासमोर उभा राहून तीं बोलून दाखविण्याची जेव्हां या माणसाची रंगीत तालीम चालू असते, तेव्हां हा इसम जवळच्या इतर माणसांना, हें सारें नाटक प्रजेला बनविण्यासाठीं आहे असें सांगत स्वतःच खदखदां हांसत सुटतो. अशा माणसाच्या सेवेंत मीं माझे प्राण वेंचले ही गोष्ट तुम्हांस नुसती हंसण्यावारी नेण्यासारखी वाटते का ?"

मृतात्मे माना डोलवतात.

दरम्यान बादशहाचें भोजन चालू झालें आहे. बादशहा चांगलाच खादाड आहे. पण त्याच्या खाण्यांपिण्यांतही एक भपकेबाजपणा आहे. मग सेनापति पुढें येऊन म्हणतो–" निराशावादी म्हणून इतरांची हेटाळणी करणं फार सोपं आहे. पण मी ज्या वेळेस येथें पोहोंचलों त्या वेळीं मला समजलें कीं माझा विश्वासघात माझ्याच एका मित्रानें केला होता. आज तो प्राणी न्यायमंत्री झालेला आहे."

पॅरी बोलण्याचा प्रयत्न करतो. पण तेवढ्यांत मृतात्म्यांतील ती स्त्री बादशहाजवळ जाऊन त्याजकडे बोट दाखवून मोठ्या त्वेषानें म्हणते–

“निराशावादी? जरा डोळे उघडून या माणसाकडे पहा. दोन शब्द लिहितां येत नव्हते, तेव्हांपासून मी याला ओळखतें आहे. मी त्याला मदत केली. मी अहोरात्र त्याच्यासाठीं राबलें. त्याची तुरुंगांतून सुटका व्हावी यासाठीं स्वत:ला विकलें देखील! त्याचें सारें वैभव, मानमरातब, सत्ता माझ्यामुळें त्याला मिळाली.”

“आणि मग पुढें?”

“पुढें काय? एक दिवस शिकारीच्या अपघातांत माझा प्राण गेला! म्हणजे यानेंच मला ठार मारलें; आणि बाहेर तसें उठविलें!”

बादशहाचें खादाड खाणें चालू आहे. मध्येंच मोठ्या खुषींत येऊन तो दांत कोरूं लागतो.

इतका वेळ शांतपणें ऐकत बसलेला पॅरी मृतात्म्यांकडे तिरस्काराची दृष्टि टाकून ओरडतो—“आणि इतकं सारं करून तुम्ही काय मिळवलंत? तुमच्या साऱ्या हकीकतींचा निष्कर्ष काय आहे? तुम्ही सारे आपल्या आयुष्यांत पराजित झालेले आहांत.”

त्याबरोबर सारे मृतात्मे अेकदम उत्तरतात—

“आम्ही काय म्हणून? तू देखील पराजित झालेला आहेस. अर्थात आम्हां सर्वांचें आयुष्य अयशस्वी झालें आहे हें कांहीं खोटें नाहीं! पण प्रत्येकाचेंच आयुष्य पराजित होत असतें.”

आतांपर्यंत पॅरीचा म्हातारा वाटाड्या एक शब्दही न बोलतां शांतपणें ऐकत होता. तो आतां अधिकारवाणीनें म्हणतो—

“माणसाच्या पाठीमागचा मृत्यूचा ससेमिरा जोपर्यंत चुकला नाहीं तोपर्यंत प्रत्येक माणसाचें आयुष्य पराजितच असतें.”

“तसं नव्हे. मृत्यूचा घाला एखाद्या माणसाच्या आयुष्यावर फार लवकर पडला असेल तरच त्याचं आयुष्य विफल झालं असं म्हणतां येईल!” पॅरी उद्गारतो.

“लवकर काय नि उशिरां काय? साऱ्यांनाच आपला मृत्यु फार लवकर आणि फार अकालीं झाला असें वाटत असतें.”

" मला माझ्याबद्दल नाहीं तसें वाटत! मी कांही लवकर मेलो नाहीं ? "

त्याबरोबर सारे मृतात्मे उपहासानें मोठमोठ्यानें खदखदतात. पॅरी क्रोधानें आणि उपहासानें ओरडतो–

" या बादशहाविरुद्ध मीं बंडाची उभारणी केली आहे. उद्यांच त्याचा स्फोट होईल. मला माझें आयुष्य पराजित झाल्यासारखें मुळीच वाटत नाहीं. जें कार्य मी करूं शकलों त्यांत मला समाधान आहे; आनंद आहे. मी तुमच्यासारखा असंतुष्ट नाही ! " असें म्हणून तो त्वेषाने दाराकडे जाऊं लागतो. जातां जातां तो म्हणतो–" मरण कोणाच्या मागचें चुकलें नाहीं ! पण त्यांतून तुम्ही निर्माण केलेलें तत्त्वज्ञान मात्र फार अजब आणि भयंकर आहे ! "

पॅरीच्या मागोमाग त्याचा म्हातारा वाटाड्याहि जाऊं लागतो. सारे मृतात्मे आपसांत कुजबुजू लागतात–

" तो जर सुखी आणि समाधानी असेल तर छान झालें. आपल्याला काय . . . निदान त्याची त्याला तरी लवकर समजूत पटेल की सारे अेकाच माळेचे मणी असतात. . . . महामूर्ख आहे झाल . . . त्याची ही धुंदी फार काळ टिकणार नाहीं . . . ' आनंदी आहे ' म्हणतो आहे . . . नशीबवान् आहे बेटा . . . "

या गलबल्यांत त्या दालनाच्या प्रचंड दरवाज्यावर थाप मारल्याचा आवाज ऐकूं येतो. तोंडांत घांस कोंबत बादशहा ओरडतो–

" कोण आहे ? "

पॅरी आणि त्याचा वाटाड्या दारापाशीं जाऊन पोंचले आहेत. तोंच द्वाररक्षक दार उघडून आंत येतो. आणि मुजरा करून बादशहाला म्हणतो, " पोलीस अधिकारी आपणाला भेटूं इच्छीत आहेत. फारच महत्त्वाचें काम आहे. असें ते म्हणत आहेत. "

" त्यांना आंत पाठवून दे ! "

द्वाररक्षक मुजरा करून निघून जातो. पॅरी आणि त्याचा वाटाड्या त्याच्या मागोमाग जाण्याच्या विचारांत आहेत. पण पॅरी उंबरठ्यावर

येऊन आपला विचार बदलतो. पोलीस अधिकारी ल्यूसीनला घेऊन आंत येताना त्याला दिसतो. ल्यूसीनच्या हातांत हातकड्या पडल्या आहेत. पॅरी ल्यूसीनला नीट न्याहाळत उद्गारतो–

" याच बदमाशानं मला गोळी घातली. " आणि मग ल्यूसीनकडे मोठ्या संतापानं मूठ हिसकून तो ओरडतो "–" पाजी, बदमाश, विश्वास-घातकी–"

पण तेवढ्यांत म्हातारा सहानुभूतीनें सल्ला देतो–" कां उगाच घसा शिणवतां ? "

पॅरीचा आवाज पडतो. तो म्हणतो–" समजलं .... पण हा पोरटा कोठल्या नरकांत जाऊन आपली पापं फेडणार आहे कोण जाणे! "

पोलीस अधिकारी बादशहास मुजरा करून उभे राहतात. बादशहाच्या जेवणाच्या टेबलाभोवती मृतात्म्यांनी गर्दी केली आहे.

" काय भानगड आहे, लॅंड्र्यू ? "

लॅंड्र्यूच्या ओठांतून शब्द फुटत नाहीं, इतका तो घाबरून गेला आहे.

" महाराज, एक फारच वाईट प्रकार घडला आहे ....मी..मी.."

" काय तें नीट स्पष्ट बोला " बादशहा हुकूम देतो.

" आपल्या अेका हेरानं फार मोठी चूक केली आहे. पॅरी ड्यूमेनला त्यानें चुकून ठार मारलें आहे–"

बादशहा पेय पितां पितां ग्लास खाली ठेवतो आणि ओरडतो–

" काय काय म्हणतां ? पॅरी ड्यूमेन मेला ? आणि ही घटना तुम्हांला सामान्य वाटते ? " टेबलावर मूठ आपटत बादशहा पुढें म्हणतो– " आतां पुढें काय होईल याची कल्पना तरी आहे तुम्हांला ? पॅरीशिवाय उद्याचें बंड होणार नाहीं ! त्याचे इतर कटवाले हें धाडस करूं शकणार नाहींत. "

पॅरीच्या चेहऱ्यावरील भाव भराभरा बदलत जातात. म्हाताऱ्या वाटाड्याला सारें कांही समजलें आहे. तो किंचित् उपरोधानें पॅरीकडे पाहूं लागतो.

लँड्र्यू म्हणतो– "महाराज, मी या इसमाला पॅरीवर फक्त पाळत ठेवण्यास सांगितलें होतें. त्यानें चुकून गोळी घातली."

पॅरी मृतात्म्यांना बाजूला सारून बादशहाजवळ जाऊन त्यांचें बोलणें ऐकूं लागतो. एकदम् त्याची मुद्रा दुःखी कष्टी झाली आहे. बादशहा संतापानें थटथयाट करीत बोलूं लागतो–

"पॅरीच्या कटवाल्यांनीं बंड करावें अशी माझी फार दिवसांपासून इच्छा होती. आपल्याला मिळालेल्या बातम्यांवरून ही एक सुवर्णसंधि ठरणार होती. अेका घावांत साऱ्या कटवाल्यांचा शिरच्छेद करतां आला असता आणि त्यांची संघटना दहा वर्षेपर्यंत ठेचून टाकतां आली असती."

पॅरीचा प्रक्षोभ अनावर झाला आहे. म्हातारा वाटाड्या जणूं आपणांस कांहींच समजलें नाहीं, असा आव आणून पॅरीला म्हणतो–

"तुम्हांला बरं वाटत नाहीं काय ?"

पॅरी उत्तर देत नाहीं.

बाकीचे सारे मृतात्मे जिवाचा कान करून बादशहाचें आणि लँड्र्यूचें बोलणें ऐकूं लागतात. त्यांच्या मुखावर उपहासाचें स्मित झळकूं लागलें आहे.

लँड्र्यू चांचपडत बोलूं लागतो–" अजून देखील अेखादी संधि मिळेल महाराज." त्यावर बादशहा कावेबाजपणें म्हणतो–

"तुमच्या भल्यासाठीं अशी संधि मिळावी अशी माझी खरोखरच इच्छा आहे लँड्र्यू उद्यां जर कटवाल्यांनीं बंड केलें नाहीं तर तुम्हाला त्याबद्दल जबाबदार धरण्यांत येईल, समजलांत ?"

लॅंड्र्यू क्षणभर घुटमळतो, आणि मग मुजरा करून दारापर्यंत जातो. बादशहा संतापानें ओरडतो– "तीन वर्षें मी ह्या संधीची वाट पहात थांबलों होतों. पोलीसांच्या खात्यावर या एका धोरणानें मी पाण्यासारखा पैसा ओतला, त्याची मातो केलीत !"

पॅरीच्या मुद्रेवरील भाव पाहून सारे मृतात्मे फिदफिदूं लागतात. लँड्र्यू दारांतून बाहेर पडत असतांनाच बादशहा ओरडून बजावतो– "उद्यां

जर बंड झालें नाहीं तर तुम्हाला आपली नोकरी गमवावी लागेल, याद राखा!"

लँड्र्यू थरथर कांपत मुजरा करतो आणि जातो.

मृतात्मे उपरोधानें फिदफिदूं लागले आहेत, असें पाहून पॅरी त्यांना क्रोधानें म्हणतो–

"माझ्या सहकाऱ्यांची उद्यां एकजात कत्तल होणार आहे आणि तुम्ही येथें दांत काढून हंसतां आहांत; शरम नाहीं वाटत?"

मृतात्म्यांतील मघांचा सेनापति उपरोधानें म्हणतो– "तुम्ही थोडे निराशावादी होऊं लागलेले दिसतां!"

"चला, चालते व्हा! तुमच्याशीं एक शब्दहि बोलण्याची माझी इच्छा नाहीं." असें ओरडून पॅरी लँड्र्यूसाठी उघडलेल्या दारांतून त्वेषानें बाहेर पडतो. पॅरीच्या पाठोपाठ त्याचा म्हातारा वाटाड्याहि बाहेर पडतो.

## क्रान्तिकारकांच्या तळावर–

एक तरुण कामगार घाईघाईनें त्या जुनाट पडक्या इमारतीत शिरत आहे. क्षणभर तो दारांतच थबकून आजूबाजूला कानोसा घेतो. त्याच्या मागें पॅरी आणि त्याचा म्हातारा वाटाड्या उभे आहेत. मग हळूच दाराशीं तोंड नेऊन तो कामगार ओरडतो– "त्यांनी ड्यूमेनचा निकाल लावला!" त्याबरोबर फरशीवर कांहीं पावलें वाजतात आणि दार उघडलें जातें. दारांत डिक्सन् येऊन उभा राहतो.

"काय म्हणालास?"

"ड्यूमेनला त्यांनीं ठार मारलेलं दिसतंय!"

घाईनें लँगलॉय दाराकडे धांव घेऊन विचारतो– "खात्री आहे तुला?"

"होय. खुद्द पॅवलोनें मला सांगितलें!"

पॅरी आपल्या सहकाऱ्यांच्या मुद्रेवरील भाव असहायतेनें बघूं लागतो.

" बदमाष–" डिक्सन गुरगुरतो– " जा पुन्हां एकदां खात्री करून घेऊन ये. नक्की शोध लागला म्हणजे काय तें माझ्या घरी येऊन सांग."

" ठीक आहे ! " असें म्हणून तो तरुण कामगार घाईघाईने चालता होतो.

डिक्सन दारांतून मागें फिरतो. दार अर्धवट उघडें राहतें. त्याच्या भोंवती उरलेले तीन कटवाले जमा होतात. त्या तिघांच्याहि मुद्रा गंभीर झालेल्या आहेत.

अर्धवट उघडया दारांतून पॅरी हळूच आतां डोकावतो. गंभीर मुद्रेनें तो त्यांचें बोलणें ऐकूं लागतो.

अखेर लँगलॉय शांततेचा भंग करून विचारतो–

" ड्यूमेनच्या मृत्यूमुळें आपल्या नियोजित बेतामध्यें तर कांहीं खंड पडणार नाहीं ना ?"

" छे ! पूर्वीपेक्षां अधिक जोरानें आपण योजलेले बेत पार पाडणार आहोंत." डिक्सन उत्तरतो– " पॅरीच्या खुनाचा बदला घेतल्या खेरीज आम्ही स्वस्थ राहणार नाहीं, तुमचें काय मत आहे ? "

पॉलीन आणि रेनोडेल मान डोलवीत म्हणतात– " एकदम मान्य ! "

" चला तर, आज आपण कामाला लागू या. आपल्याला एका क्षणाचीहि फुरसत नाही. "

पॅरी अर्धवट उघडया असलेल्या दारांतून अजूनहि डोकावून ऐकत आहे. आपल्या सर्व शक्तीनिशी दार उघडून आंत येण्याचा तो प्रयत्न करतो. पण दाराला मुळीं मुद्धां धक्का पोहोंचत नाहीं. तेवढ्यांत पॉलीन धक्का देऊन दार बंद करून टाकतो. पॅरी बंद झालेल्या दारावर धडक्या देत उभा राहतो. पण दारावर कसलाहि ध्वनि उमटत नाहीं. दारावर धडक्या देत पॅरी ओरडू लागतो–

" मित्रहो ! तुम्ही फशीं पडतां आहांत. आपले सारे बेत रद्द करा. तुमच्या भोंवतीं फांस पसरून ठेवला आहे. सावध ! "

प्रत्युत्तरादाखल आंत खोलीमध्यें फरशीवर फक्त पावलांचा आवाज ऐकू येतो. क्षणभरानें दाराच्या आंतून कडी घालण्यांत येते. पॅरी आपल्या

म्हाताऱ्या वाटाड्याकडे पाहतो. तो त्याला अधिक कष्ट न घेण्याबद्दल खुणावत आहे. पॅरीला आपल्या प्रयत्नांची विफलता जाणवते. आणि प्रथमच त्याच्या मुद्रेवर असहायता उमटू लागते. उद्वेगानें मागें वळून तो उद्गारतो.

" उद्यां या साऱ्यांची कत्तल तरी होईल नाहींतर ते पकडले जातील. आणि हें सारें माझ्या चुकीमुळें. "

म्हातारा आपले खांदे उडवीत निर्विकारपणें म्हणतो–

" झाल्या गेल्या गोष्टींना कोण काय करणार ? "

पॅरी संतापानें, उद्वेगानें आणि अगतिकतेनें जिन्याच्या कठड्यावर आपली मूठ आपटू लागतो.

## ईव्हच्या घरीं–

ईव्हच्या शय्यागृहात ईव्हचा मृत देह तिच्या पलंगावर ठेवलेला आहे. जवळच ल्युसेटा तिचा हात हातात घेऊन विलाप करीत आहे. मागें हा सारा प्रकार दगडी मुद्रेनें पहात आँद्रे स्तब्ध उभा आहे. ईव्ह भितीला टेकून उभी आहे. सूक्ष्मपणें तिचें साऱ्या घडामोडींवर लक्ष आहे. ल्यूसेटा भावविवशतेनें आपल्या बहिणीच्या निष्प्राण हाताचें चुंबन घेते. आणि हुंदके देत उद्गारते– " ईव्ह.... ईव्ह.... माझ्या लाडक्या ईव्ह ! "

आँद्रे हळूच खालीं वाकतो. आणि हलकेच तिचे खांदे धरीत तिला जवळ घेत म्हणतो– " ल्यूसेटा, किती दुःख करून घ्यायचं ! " त्याच्या अनुनयाला ल्यूसेटा वश होते. ती आपली मान त्याच्या खांद्यावर टाकते. तो तिच्या कमरेभोंवती विळखा घालून हलकेच तिला कोचावर नेऊन बसवतो.

ईव्ह शांतपणें कोचाच्या मागें येऊन उभी राहते. तिची नजर त्या दोघांवर खिळली आहे. तिची मुद्रा अत्यंत कष्टी आहे.

तेवढ्यांत कुणा माणसाचा आवाज तिच्या कानीं येतो.

" कोण ? ईव्ह ! "

ईव्ह चमकून वळून पाहते. तिच्या मुद्रेवरील उद्विग्नता नाहींशी होते. आणि तिचे डोळे आश्चर्यानें आणि हर्षानें चमकूं लागतात. ती एकदम् उद्गारते– " कोण– पपा ! "

ईव्हचे वडील मधुर स्मित करीत अर्धवट उघडया दारांतून हल्केंच आंत येतात, आणि ईव्हजवळ येऊन म्हणतात– " तूं आमच्यांत नुकतीच आलेली आहेस असं कळलं मला, म्हणून तुझं स्वागत करायला मी आलों आहे."

ईव्हचे वडील म्हातारे आहेत. पण ते मोठे ताठ अन् करारी दिसतात. त्यांचा पोशाख मोठा छान छोकीचा आणि रुबाबदार आहे. ते ईव्हजवळ येतांच ईव्ह भावविवशतेनें मिठी मारीत म्हणते–

" पपा, किती आनंद झाला मला ! किती दिवसांनीं मला तुम्ही भेटतां आहांत ! .."

तिचे वडील तिच्या कपाळाचें चुंबन घेत तिला हलकेच दूर करतात. ईव्ह मग ल्यूसेटाकडे बोट दाखवून अगतिकतेनें म्हणते–

" पपा .... ही आपली छोटी ल्युसेटा .... या इथं काय प्रकार चालला आहे तो तुम्हांला कळायला हवा. "

तिच्या वडिलांची मुद्रा किंचित् गोंधळल्यासारखी आणि त्रासिक होते. ल्यूसेटाकडे न पाहतांच ते म्हणतात–" या असल्या गोष्टीत लक्ष घालण्याची कांहीं विशेष जरुरी आहे काय ? मला क्षणाचीही फुरसत नाही पोरी. "

तरी पण ईव्ह बळानें त्यांची नजर कोचाकडे खेचत म्हणते–" तें पहा ! " ल्यूसेटा ऑद्रेच्या खांद्यावर मान टाकून त्याला बिलगून अजूनहि हुंदके देत आहे. त्यानें तिला आपल्या बाहुपाशांत घट्ट आवळलें आहे.

तिचे वडील त्या दोघांकडे पाहतात. आणि त्यांची मुद्रा अधिकच गोंधळल्यासारखी होते.

ईव्ह विचारते–" पाहिलंत ? "

" रडू नकोस ल्यूसेटा–" आँद्रे तिची समजून घालीत म्हणतो–

तेवढयांत ईव्ह म्हणते–" ऐका तो काय म्हणतो आहे तें–"

आँद्रे म्हणतो–" तूं एकटी आहेस असं तुला वाटायचं कांहीं अेक कारण नाहीं. ईव्हचं जितकं तुझ्यावर प्रेम होतं त्यापेक्षांहि माझं तुझ्यावर अधिक प्रेम आहे. तूं किती सुंदर दिसतेस ! "

ल्यूसेटा डोळे पुसून आँद्रेकडे पाहते आणि बालकाच्या निरागसतेनें ती त्याच्या खांद्यावर पुन्हा मान टाकते. ईव्ह अपरंपार कारुण्यानें आपल्या बहिणीकडे पाहते आणि तिच्या केसावरून हात फिरवूं लागते. आँद्रे तिच्या मस्तकाला स्पर्श करतो. त्या क्षणीं आपला हात मागें घेत ईव्ह ओरडते–

"पपा–"

"जाऊं दे पोरी–" असें कांहींसें म्हणत तिचे वडील कष्टी मुद्रेनें दूर होऊं लागतात.

"पपा मी त्याच्या मार्गात आड येत होते. म्हणून त्यानं मला विष घालून ठार मारलें." तिचे वडील दोन पावलें मागें वळत निर्विकारपणें म्हणत–

"होय पोरी. मी तो सारा प्रकार पाहिला होता. त्यानं असं करायला नको होतं."

आपल्या पित्याच्या उदासीनतेनें चकित झालेली ईव्ह चिडून ओरडते–

"पण पपा मी तुमची मुलगी आहे. तो तिच्या आयुष्याचा सत्यानाश करणार आहे,"

"हं! फारच वाईट गोष्ट आहे!"

"असं म्हणून तुम्ही स्वस्थ राहणार आहांत!"

तिच्या वडिलांचा प्रक्षोभ अनावर होतो. आणि ते म्हणतात–

"मी काय करावं अशी तुझी अपेक्षा आहे? इथं काय प्रकार होणार आहेत त्याची पूर्ण कल्पना होती. आणि त्याबाबत मी कांही करूं शकत नाहीं, याचीहि मला पूर्ण जाणीव होती. मला जाऊं दे कशी?"

आणि मग ते क्रोधानें आँद्रेकडे वळून म्हणूं लागतात–

"आम्हीं तुला पहात आहोंत. आँद्रे तुझें सारें बोलणें आम्हीं ऐकत आहोंत. एक दिवस तुला तुझ्या कृत्यांचा जाब द्यावा लागेल....ल्युसेटा ....माझ्या गळ्याची शपथ आहे तुला....मी काय सांगतो आहें, तें ऐक......"

ल्युसेटा आँद्रेला बिलगत किंचित् हंसून म्हणते–" आँद्रे, तूं किती चांगला आहेस ! "

तिच्या वडिलांचें वाक्य मध्येंच तुटतें. त्यांचा राग खालीं पडतो. त्यांची मुद्रा अगतिक आणि असहाय होते. मग ते ईव्हला म्हणतात.

" पाहिलंस, तू माझी काय अवस्था करून टाकलीस ती–? तुझ्यामुळें मी हास्यापद झालों आहें. मला वाटतं मी इथून जावं, हेंचं बरं ! " असें म्हणून ते दाराकडे जाऊं लागतात.

ईव्ह त्यांच्या मागोमाग धावत जाते आणि म्हणते–

" पण, पपा ल्यूसेटा तुमची सर्वात लाडकी होती ! "

" ऊं ! जिवंत माणसांना मृतात्मे लवकर विसरतात ! तुला लवकरच अनुभव येईल. तू या बदमाशाशी जेव्हां लग्न ठरविलंस त्या वेळीं मला किती कष्ट झाले, याची तुला कल्पना आहे ? मी वारंवार तुझ्या कानी कपाळीं ओरड केली. पण माझा एक शब्दहि न ऐकतां तू त्याच्याशीं अनुनय करण्यांत रमली होतीस. अगदीं ल्युसेटाप्रमाणें ! जाऊं दे. मला इथं उभं राहवत नाही. आमचा ब्रिजचा खेळ तिकडे सुरू झाला असेल. मला उशीर होईल. "

ईव्ह आश्चर्यानें विचारते–" ब्रिजचा खेळ ? "

" होय ! आम्ही मृतात्मे जिवंत माणसांचा ब्रिजचा चाललेला डाव पहात असतो. आम्हांला चारीहि माणसांची पानें दिसतात. अशी गंमत होते म्हणतेस ! हीं पानें जर आम्हांला हातांत धरतां आली तर आम्हीं जिवंत माणसांपेक्षां कितीतरी पटीनें हा खेळ चांगला खेळलों असतों. "

बोलत बोलत ते दोघे दाराशीं येऊन पोहोंचतात. तेथून ते मागें वळून पाहतात.

आँद्रे आणि ल्यूसेटा दोघेहि कोचावरून उठतात. तिला जवळ घेऊन आँद्रे पलीकडच्या शय्यागृहांत जाऊं लागतो. तो दार उघडतो.

त्याला जातांना पाहतांच ईव्ह परत फिरते. आणि धांवत त्यांचा पाठलाग करूं लागते. पण तेवढ्यांत आँद्रे दार बंद करून घेतो. ईव्ह दाराला धडक्या देऊं लागते. पण त्याचा कांहींहि उपयोग होत नाहीं.

ईव्ह दु:खानें विवळते– " ल्युसेटा......ल्युसेटा...... "

ईव्हचे वृद्ध वडील दारांतूनच तिला अखेरचा सल्ला देतात– " हें पहा पोरी, इथं येण्यानं तुला दुःख होत असेल तर इथं येत जाऊं नकोस. बरं आहे, जातों मी." आणि ते निघून जातात.

ईव्ह निश्चल उभी राहते. आणि त्या बंद दरवाजाकडे अखेरचा करुण अगतिक दृष्टिक्षेप टाकते.

## मृतात्म्यांच्या कचेरींत–

ती प्रौढ स्त्री आपल्या मेजापाशीं बसली आहे. आणि तिच्या समोर घाबरी घुबरी झालेली एक छोटी पोरगी थरथर कांपत उभी आहे. तिचे केस भिजून चिंब झाले आहेत. तिच्या समोर लेखणी करत आणि आपल्या चष्म्यांतून तिला न्याहाळत प्रौढ स्त्री म्हणते– " छान! छान केलंस! असल्या वयांतच तू पाण्यांत बुडून मेलीस, यासारखी लाख मोलाची गोष्ट नाहीं......इथं या जागीं सही कर...... "

आणि सही केल्यानंतर ती पोरगी तिथेंच उभी राहिलेली आहे असें पाहून प्रौढ स्त्री तिला खुणावत म्हणते– " त्या दारानं तू जाऊं शकतेस मुली! "

ती निघून जातांच ती प्रौढ स्त्री टीपकागदानं खातें–पुस्तकांतील ताज्या नोंदी टिपते. आणि स्वत:शींच उद्गारते-- " चला आजच्या दिवसाचें काम तर संपलें. "

त्याक्षणीं एका गंभीर पुरुषी आवाजांत शब्द घुमतात– " छे, छे! मॅडम बारबेझत्, अजून काम संपलें नाहीं. "

त्याबरोबर बाई चमकून आजूबाजूला पाहतात; खुर्चीवर एखाद्या आज्ञाधारक नोकराप्रमाणें सावरून बसतात. त्या गंभीर पुरुषी आवाजांत तिला हुकूम दिला जातो–

" तुमच्या खातें–पुस्तकांतील 'तक्रार विभाग' चाळून पहा. "

"'होय महाराज" आपली दृष्टि खातें पुस्तकांत खुपशीत बाई अज्ञात संचालकाला उत्तर देते.

कपाळावरील चष्मा नाकावर ओढून बाई खातें–पुस्तकांतील 'तक्रार विभागा'चीं पानें शोधून काढते. त्यांतल्या प्रमुख पानावरच ठळक अक्षरांत लिहिलें आहे —

"पॅरी ड्यूमेन–ईव्ह चार्लीयर, साडे दहा वाजतां प्रेमिकांच्या उद्यानांत भेट." हा मजकूर वाचून बाई पुस्तक मिटून ठेवते, आणि सुस्कारत उद्गारते–

"हूं ! हें प्रकरण कांहीं साधें दिसत नाहीं ! आतां फारच गुंतागुंती होऊं लागल्या ! "

## उद्यानांत–

पॅरी आणि त्याचा म्हातारा वाटाड्या मोठ्या मजेंत उद्यानांतील छोट्या पायरस्त्यावरून चालले आहेत. पॅरी खुषींत येऊन आपल्या मित्राला म्हणतो —

" मरण म्हणजे एक गंमत आहे, नाहीं ? "

" खरं आहे ! .... पण त्याच्यासाठी माणसाला किती अडचणी आणि गैरसोयी सोसाव्या लागतात, त्यांचा कांहीं हिशेब ?"

" पण तशी माणसाची करमणूकहि पुष्कळ होते ! "

" होय, तें कांहीं खोटें नाहीं ! कसल्या जबाबदाऱ्या नाहींत; काळजीचे भुंगे मागें नसतात; मग चाहेल तिकडे जाण्याचें स्वातंत्र्य...."

पॅरी कडवटपणें हंसून म्हणतो– " तसें कशाला ? आतां या बादशहाचीच गोष्ट घ्या...." " तुमच्या डोक्यांतून अजून हा बादशहा गेलेला दिसत नाहीं ! तुम्ही म्हणजे बुवा फारच....अगदीं प्रत्येक गोष्टीकडे, जिवंत माणसांच्या दृष्टिकोनांतून बघत असतां ! आतां केव्हां रुळणार तुम्ही या अवस्थेमध्यें ?"

" मला नाहीं वाटत, या अवस्थेमध्यें मी कधीं रुळूं शकेन असं ! "

म्हातारा त्यावर कांहीं उत्तर देणार, तोंच त्याच्या जवळून अठराव्या शतकांतील सरदार घराण्यांतील एक लावंण्यवती स्त्री जाऊं लागते, तिकडे त्याचें लक्ष जातें. त्याबरोबर म्हातारा झटकन् खुलतो आणि म्हणतो.... " आणि कांहीं मृतात्मे भारी गुलजार असतात....."

पॅरी त्यावर कांहीच उत्तर देत नाहीं. चालतां चालतां ते दोघे पायरस्त्याच्या टोकाला येतात. या रस्त्याच्या कोपऱ्यावर एक आंधळा आणि पांगळा वृद्ध भिकारी पांवा वाजवीत बसलेला पॅरीला दिसतो. त्यांच्या वाजविण्यांत विलक्षण गोडवा आहे. जाणारीं येणारीं माणसें त्यांच्या थाळीत पैसा दोन पैसे टाकून पुढें जात आहेत. पॅरी या भिकाऱ्यासमोर थबकतो. क्षणभर असूयेनें तो त्याजकडे पहात राहतो; आणि मग आपल्या म्हाताऱ्या वाटाड्याला तो म्हणतो– " कांहीं म्हटले तरी जिवंत माणसांची सर कांहीं मृतात्म्यांना येणार नाहीं! उदाहरणार्थ, हा भिकारीच पहा! हा म्हातारा अगदी सर्व दृष्टीनें निकामी झालेला आहे. पण तरी देखील, तो कांहीं तुमच्या आमच्यासारखा मेलेला नाही!" पॅरी सहजगत्या त्याच्या शेजारीं बैठक मारतो. मंत्रमुग्ध होऊन तो त्याचा पांवा ऐकू लागतो. त्याच्या वृत्ति उल्हासानें बहरून येऊं लागतात. एकाएकी त्याच्या डोक्यांत कांहीं एक विचार येऊन तो मान वर करून म्हाताऱ्याला विचारतो– " काय हो, आपली अपुरी कामें पुरीं करण्यासाठीं माणसाला पुन्हा केव्हांहि मृत्युलोकीं जातां येत नाहीं का?"

पण म्हातारबोवांचें पॅरीच्या प्रश्नाकडे लक्ष आहे कोठें? आपला चष्मा पुसून तो नाकावर ओढत, अठराव्या शतकांतील ती लावण्यमयी स्त्री पाहण्यात स्वारी गुंतली आहे. सदर स्त्री पुन्हा जवळपास येत आहे. असें पाहून म्हातारबोवा लगबगीने पॅरीला म्हणतात–" माफ करा हं! एका कामासाठी .... म्हणजे तसं कांहीं विशेष नाहीं .... पण घटकाभर गमत .. "

पॅरी हंसून म्हणतो–" आलं लक्षांत! जा, गेलात तरी चालेल!" पडत्या फळाची आज्ञा घेऊन म्हातारा सटकतो. पॅरी मोठ्या मायेनें त्या

वृद्ध भिकाऱ्याच्या खांद्यावर हात ठेवून एकतान वृत्तीनें त्याचा पांवा ऐकूं लागतो.

" काय चाललं आहे ? "

पॅरी दचकून वर पाहतो. ईव्ह त्याच्याकडे पाहून हंसत हंसत प्रश्न विचारते. ती त्या स्थळीं केव्हां आली, तें त्याच्या लक्षांतही येत नाहीं. पॅरी ईव्हला खोचून उत्तरतो–

" कांही हंसण्यासारखं तर खचित नाहीं ! "

" या भिकाऱ्याशी चाललेली तुमची सलगी पाहून मला हंसू आलं ! "

"कां बर? हा भिकारी असला तरी चांगला ठणठणीत जिवंत आहे! "

" गरीब बिचारा ! . . . ." भिकाऱ्याकडं पाहून ईव्ह अनुकंपेनं म्हणते– " मी जिवंत होतें, त्या वेळी त्याच्या थाळीत नेहमीं पैसा दोन पैसे टाकीत असे. पण आतां. . . ." बोलतां बोलतां तीहि या भिकाऱ्याच्या शेजारीं बसते. एका बाजूला पॅरी, आणि त्याच्या दुसऱ्या बाजूला ईव्ह असे दोघे बसतात आणि असूयेनें त्याच्याकडे पाहूं लागतात. पॅरी म्हणतो–

" होय ! आतां आपण काय त्याला देणार ? तोच आपल्यापेक्षां श्रेष्ठ आहे ! खरंच, क्षणभर या म्हाताऱ्याच्या शरीरांत मला प्रवेश करून जिवंत होतां येईल, तर काय बहार होईल ! "

" माझ्याहि मनांत हाच विचार आला होता–" ईव्ह म्हणते.

" कां– ? मृत्युलोकी तुमच्यावांचून कांहीं कामं खोळंबलीं आहेत वाटतं ? कसली तरी काळजी लागल्यासारखी तुमची मुद्रा दिसते आहे ! होय ना ? "

ते असें बोलत आहेत तोंच तो वृद्ध भिकारी आपलें अंग कराकरा खाजवू लागतो. पण ईव्ह आणि पॅरी या दोघांचें त्याकडे लक्ष जात नाहीं, कारण ते दोघे एकमेकांच्या सुखदुःखाचा विचार करूं लागतांच, त्यांची दृष्टि परस्परांवर खिळून राहते. पॅरी कष्टी मुद्रेनें तिला म्हणतो– "माझं दुःख विसरण्याचा मी मघांपासून प्रयत्न करतों आहें. पण मला कांहीं झाल्या गेल्या गोष्टी विसरतां येत नाहींत. "

एकाएकी पॅरी हंसूं लागतो. त्याला हंसतांना पाहून ईव्ह गोंधळून विचारते–

"हंसायला काय झालं?"

"या म्हाताऱ्याच्या शरीरांत तूं कशी दिसशील याचा मी विचार करीत होतों. त्याच्या शरीरांत जर तूं प्रवेश केलास तर तुझ्या सौंदर्याचा मागमूस तरी शिल्लक राहील का?"

ईव्हची कळी खुलते आणि ती म्हणते– "मी कांहीं या म्हाताऱ्या-बद्दलच बोलत नव्हतें. कोणाहि जिवंत माणसांविषयी मी असंच म्हटलं असतं!"

"पण तरी देखील या अदलाबदलींत तुझी तू कांहीं उरणार नाहींस, त्याची काय वाट?"

बोलतां बोलतां दोघेहि उठतात, आणि चालू लागतात. दोघेहि न कळत एकमेकांच्या अगदीं निकट, स्तब्धतेंत आणि गर्द वृक्षराजींच्या छायेंत चालले आहेत. वाटेंत दोन अगदीच सुमार दिसणाऱ्या स्त्रिया त्यांच्या समोरून निघून जातात. विचार करतां करतां पॅरी एकदम उद्गारतो–

"असं क्वचितच घडत असेल, नाहीं?"

ईव्ह न समजून विचारते–"काय क्वचितच घडत असेल?"

"आपलं व्यक्तित्व न गमावतां दुसऱ्याच्या शरीरांत प्रवेश करणें, जवळ जवळ अशक्य आहे"

पॅरीनें सूचक रीतीनें तिच्या लावण्याची केलेली स्तुति तिला आवडते आणि ती मंद स्मित करते. तेवढ्यांत आणखी अेक सुंदर स्त्री त्यांच्या समोरून जाते. ईव्ह म्हणते–

"ही माझ्यापेक्षांहि देखणी आहे. तिच्या शरीरांत प्रवेश करणें मला तरी आवडेल."

त्याबरोबर पॅरी त्वेषानें मान हलवून नाही म्हणतो. जणूं ईव्हला कांहीं सौंदर्यदृष्टीच नाहीं, असें त्याला सुचवायचें आहे. आणि असें

करतांना सहजगत्या तो तिचा हात हातांत घेतो. ती किंचित् दूर सरकते. पण आपला हात त्याच्या हातांतच राहूं देते.

तिच्याकडे न पाहतां पॅरी म्हणतो–" तूं फार सुंदर आहेस ! "

" मी फार सुदर होते "–ईव्ह त्याची चूक दुरुस्त करते.

त्यावर पॅरी उत्तरतो–" नव्हे, नव्हे. तू अजूनहि सुदर आहेस. मृत्यु तुला किती पण शोभून दिसतो म्हणून सागू ! आणि तुझ्या अंगावरला हा मोल्यवान झगा .... "

" नृत्याला जातांना घालण्याचा हा झगा आहे. "

दोघेहि पुन्हां शांतपणें चालूं लागतात. मग क्षणभरानें तो विचारतो–

" तू याच शहरांत राहतेस काय ? "

" होय. "

" केवढें दुर्दैव हें ! " पॅरी पुटपुटतो–" तुझी माझी यापूर्वीच गांठ पडली असती तर .... तू काय केलं असतंस ? "

उत्तर देण्यासाठी पॅरी झटकन् तिच्याकडे वळतो. कांहीं शब्द उचंबळून ओठाबाहेर पडू लागतात. पण वस्तुस्थितीची जाणीव होतांच ते शब्द आंतल्या आंत विरतात. त्याची मुद्रा काळवंडते आणि तो खिन्नपणानें म्हणतो– " कांही नाही ! "

न बोलतां ते पुन्हां चालू लागतात.

## अेका उपाहारगृहांत–

ईव्ह आणि पॅरी चालतां चालतां एका नितांत रमणीय अशा स्थळीं येऊन पोहोंचतात. याच ठिकाणी अेक चैनी आणि विलासी लोकांचें थाटामाटाचें उपाहारगृह आहे. आणि त्याला जोडूनच प्रेमिकाचें आणि षौकिनांचें एक नृत्यगृह आहे. या उपाहारगृहांत येणारे बड्या घराण्यांतले स्त्री-पुरुष छानछोकीच्या पोषाखात मोठ्या भपकेबाजपणें येत असतात.

उपाहारगृहाच्या दाराशीं येतांच पॅरी ईव्हला म्हणतो–

" आपण इथं घटकाभर थांबू या का ? "

ईव्ह मान डोलावून मान्यता देते. तेवढ्यांत कोणी अेक देखणी स्त्री ऐटबाजपणें घोड्यावरून दोडत येते, आणि उपाहारगृहाच्या दाराशीं खालीं उतरते. दाराशीच रेंगाळणारे नोकर झटकन् पुढें होतात आणि त्या बाईच्या घोड्याचा लगाम आपल्या हातीं घेतात. तिला पाहून उपाहारगृहांतून तिचे दोनचार गुलहौशी दोस्त बाहेर येतात. आणि तिचें दरबारी थाटांत स्वागत करतात. पॅरीचें लक्ष या तरुण स्त्रीच्या वेशभूषेकडे सहजगत्या जाते आणि तो म्हणतो–" घोड्यावरून रपेट करण्यासाठीं एवढा थाट कशाला करावा लागतो कोण जाणे ! "

ईव्ह हंसून म्हणते–" मीं अनेकवेळां तिला तसंच म्हटलं होतं····" आणि मग त्या तरुण स्त्रीला उद्देशून ईव्ह विचारते–"मॅडेलीन्, सांग मी तुला म्हटलं होतं कीं नाहीं ? " मॅडेलीन् आपल्या स्वागतांतच गर्क आहे. पॅरी गोंधळून ईव्हला विचारतो–

" या बाईची आणि तुझी ओळख होती का ? "

" माझ्या नवऱ्याचें ती एक प्रेमपात्र आहे ! "

मॅडेलीन् आपल्या दोस्तांच्या समवेत एका टेबलापाशी, कांहीं छानछोकीच्या भपकेबाज पोशाखांत बसलेल्या स्त्री–पुरुषांकडे जाते. दोन छाकटचा पोशाखांतील तरुण दरबारी पद्धतीनें उठून वांकून तिच्या हाताचें चुंबन घेतात. आणि कोणी एक इसम अदबीनें तिच्या पुढें खुर्ची करतो. या स्वागताचा स्वीकार करीत ती देखणी तरुणी स्थानापन्न होते.

हें सारें दृश्य अनिमिष नेत्रांनीं पाहात असलेला पॅरी ईव्हला म्हणतो–

" जिवंत असतांना तूं अशा उपाहारगृहांत येत असशील नाहीं ? "

ईव्ह मानेनंच होय म्हणते.

पॅरी पुन्हां विचारतो–" कोणी उमदे तरुण त्या वेळीं तुझ्या हाताचं असंच चुंबन घेत असतील ? होय ना ? "

ईव्ह मंद स्मित करते. पॅरी तिला म्हणतो–" आपण थोडा वेळ इथं थांबूं या ! "

ईव्ह त्याला रुकार देते. दोघेहि आंत येतात. रिकामें टेबल शोधीत ते एका कडेला येऊन पोंचतात. मग पॅरी ईव्हचा हात दरबारी पद्धतीनें वांकून आपल्या हातांत घेतो आणि चुंबन घेतो. तिच्यापुढें खुर्ची केल्यासारखें करून तो तिला बसण्यास विनवितो. तीहि या दरबारी स्वागताचा स्वीकार करते आणि खालीं बसते. पॅरी तिच्या जवळच्या खुर्चीवर बसतो. दरबारी उपचारांचा हा खेळ पाहून ईव्ह हंसू लागते.

पॅरी किंचित खट्टू होऊन म्हणतो–" मला हे दरबारी उपचार जमत नाहीत हेच खरं ! मला एकदां हे रीतीरिवाज शिकायला हवेत ! "

ईव्ह झटकन् म्हणते–" छे छे असं तू मुळींच वाटूं देऊं नकोस ! किती तरी गोष्टी तुला उपजतच चांगल्या साधल्या आहेत .... " पॅरी विचारमग्नतेनं शून्यांत पाहूं लागतो. ईव्ह क्षणभर त्याच्याकडे रोखून पाहते आणि मग विचारते–" हें स्थळ तुला आवडलें का ? "

" होय आवडलं ! "– पॅरी विचारमग्नतेनं म्हणतो– " पण येथें जमणारी माणसं कांही मला आवडलीं नाहीत ! " पुन्हा कांहीं वेळ दोघेहि स्तब्ध राहतात.

मग ईव्ह लाडक्या रुसव्यानं म्हणते– " तू भारी अबोल आहेस ! "

पॅरी तिच्याकडं पाहून मधुर स्मित करतो. तो म्हणतो– " तसं कांही नाही ! मला तुझ्याशी फार बोलावंसं वाटतं ! पण मी बोलण्याचा प्रयत्न करूं लागतांच सारं कांहीं विसरून जातो. पाहा बरं; तूं फार सुंदर आहेस, असं मला वारंवार तुला सांगावंसं वाटतं. पण तुझ्या रूपाचा मी जों जों विचार करूं लागतो, तों तों माझं मन फार कष्टी होतं. कांहीं तरी हरपल्याच्या जाणिवेनं माझ्या मनाला हुरहूर लागते...... "

ईव्ह खिन्नपणानें हंसते. ती कांहींतरी उत्तर देण्याच्या विचारांत आहे; तोंच एक तरुण आणि तरुणी त्यांच्या मेजासमोर येऊन उभे राहतात. तो तरुण आपल्या प्रेयसीला विचारतो " इथंच बसूं या आपण ? "

ती तरुणी रुकार देते. तिचा प्रियकर पुन्हा विचारतो– " तूं माझ्याजवळ बसणार कीं माझ्यासमोर ? "

या प्रश्नाबरोबर ती लाजते आणि घुटमळत उद्गारते– " तुझ्याजवळ......"

ईव्ह आणि पॅरी ज्या टेबलाजवळ बसले आहेत, त्याच टेबलापाशीं पण निराळ्या खुर्चीवर ते दोघे जवळ जवळ बसतात. तेवढ्यात उपाहार-गृहांतील परिचारिका येऊन अदबीनें समोर उभी राहते. तो तरुण थोडेसें मद्य आणि कांही खाण्याचे पदार्थ आणण्यास तिला फर्मावतो.

त्या नव्या तरुणीकडे पाहून ईव्ह म्हणते– " फार सुन्दर आहे, नाहीं ही ?"

" फारच सुन्दर !" पॅरी उत्तरतो, पण त्याची दृष्टि मात्र ईव्हवर खिळली आहे. ती तरुणी आपल्या प्रियकराला विचारमग्न पाहून म्हणते– " कसला विचार चाललाय एवढा ?" तो तरुण हसून उत्तरतो " माझ्या मनांत विचार असा येत होता की, या शहरांत जवळ जवळ वीस वर्षें आपण राहात होतों, आणि आपली एकदांसुद्धां गांठ पडली नाहीं......"

" ल्यूसीएनाच्या घरी जर आपली भेट झाली नसती तर......" ती म्हणते.

" तर आपली कधीच भेट झाली नसती !" तो उत्तरतो.

" आणि मग आपल्यावर केवढें दुर्दैव ओढवलें असतें ! परस्परांच्या प्रीतीला आपण कायमचें अंतरलों असतों ! ......"

तेवढ्यांत परिचारिका मद्याचे पेले आणि खाद्यपदार्थांनीं भरलेल्या सुशोभित बशा आणून ठेवते. दोघेहि मद्यपानाला आणि भोजनाला मोठ्या खुषींत आरंभ करतात. आणि मग ते पुन्हां हलकें हलके कुजबुजू लागतात. ती तरुणी लाडक्या रुसव्यानें आपल्या प्रियकराला कानउघाडणीच्या स्वरांत म्हणते– "......पण त्या दिवशी तुझं कांहीं माझ्याकडं लक्ष नव्हतं ?" "कोणाचें ? माझें ?" मोठ्या त्वेषानें आरोपाचा इन्कार करीत तो उत्तरतो–" छे छे ! अगदीं खोटं आहे. तुला ज्या वेळीं मी पहिल्यांदां पहिलं त्याच वेळीं मला वाटलं कीं विधात्यानं अगदीं माझ्यासाठींच तुला निर्माण केली असली पाहिजे !"

हे उद्गार ऐकत पॅरी आणि ईव्ह एकमेकांकडं पाहूं लागतात. असलेच कांही शब्द बोलण्यासाठी त्या दोघांचे ओठ थरथरूं लागतात.

तेवढ्यांत तो तरुण आपल्या प्रेयसीला म्हणतो– "तू मला किती आवडतेस म्हणून सांगू !" मोठ्या प्रेमानं हे उद्गार ऐकत ती तरुणी आपल्या प्रियकराला बिलगते. तो तिला म्हणतो– "तुझी प्रीति ही माझी केवढी शक्ति आहे, याची तुला कल्पना नाहीं ! त्यामुळें माझ्या अंगीं नवें चैतन्य संचारल्यासारखें मला वाटत आहे ! आज, या घटकेला, प्रचंड डोंगरांची उलथापालथ मी करूं शकेन, असं मला वाटू लागलं आहे !"....

ईव्ह आणि पॅरी एकमेकांकडे अभिलाषेनें व्याकुळ होऊन बघूं लागतात. न कळत तीं दोघें एकमेकांच्या जवळ येतात. एकमेकांना बिलगू पाहतात. पण तेवढ्यांत ईव्ह उठत त्याला म्हणते—"आपण नृत्य करूं या का ?"

पॅरी विस्मयानं तिच्याकडे पाहतो आणि उत्तरतो–"छे, छे, मला चांगलें नृत्य करतां येत नाही."

"हरकत नाहीं ! तरी देखील आपण नाचूं या."

पॅरी घुटमळत उठत म्हणतो–"सारे लोक आपल्याकडे पाहतील ना ?"

ईव्ह मनःपूर्वक हंसत म्हणते–"किती वेडा आहेस तू ! आपणाला कोण पाहणार ?"

आपली चूक लक्षांत येऊन पॅरी देखील मनःपूर्वक हंसतो. आणि मग तिच्या कमरेभोंवतीं हाताचा विळखा घालीत तो तिच्याबरोबर नृत्य करूं लागतो.

ईव्ह त्याला लाडिक रागांत म्हणते–

"किती खोटं बोलतोस रे तूं ? तुला छान नृत्यं करतां येतं !"

पॅरी हंसून म्हणतो–"आज पहिल्या प्रथमच तुझ्या तोंडून मी ही बातमी ऐकतों आहे !"

" नृत्य करण्यासाठीं तुला फक्त माझी जरुरी होती ? होय ना ! "

" मला देखील तसंच वाटतं ! "

नृत्य करीत असतां दोघांची दृष्टि एकमेकांत मिसळते. जणूं प्रवाहांत प्रवाह मिसळावा, त्याप्रमाणें तीं दोघें एकमेकांत विरून चाललीं आहेत.

कांहीं वेळानें पॅरी भानावर येतो आणि म्हणतो–" काय चमत्कार आहे हा ! घटकेपूर्वी माझ्या मनाला अनेक चिंतांच्या जळवा लागल्या होत्या. आणि आतां इथं मी तुझ्या बरोबर नृत्य करीत आहें. तू, आणि तुझं मधुर स्मित या खेरीज मी कांहींहि पाहूं शकत नाहीं. तुझ्याशिवाय माझ्या मनांत दुसरा कसलाहि विचार नाहीं ! मरण मरण म्हणून म्हण-तात तें जर हेंच असेल......"

" हें ? "

" होय ! अनंत कालपर्यंत तुझ्याबरोबर नृत्य करीत रहावं, तुलाच पहावं, आणि तुझ्याशिवाय सगळ्या गोष्टीचा विसर पडावा, हेंच जर मरण असेल तर......"

" तर काय ? "

" तर जीवनापेक्षां मृत्यु श्रेष्ठ आहे असें कोण म्हणणार नाहीं ? तुला नाही असं वाटत ? "

ईव्ह भावविवशतेनें म्हणते– " पॅरी, मला तुझ्या हृदयाशीं दृढ कवटा-ळून धर ! "

ते एकमेकांच्या दृढ बाहुपाशांत बद्ध होतात. क्षणार्धांत पॅरी भाना-वर येतो. त्याची मुद्रा खिन्न होते. तो नृत्य थांबवतो, आणि तिच्या-पासून दूर होत पुटपुटतो–

" हा सारा वेडेपणा आहे ! मला तुझ्या शरीराचा स्पर्शदेखील घडला नाहीं. "

" खरं आहे. " ईव्ह खिन्नपणें म्हणते– " जणूं आपण एकएकटेच नृत्य करीत आहोंत. "

पॅरी तिच्याकडे अनिमिष नेत्रांनी पाहत म्हणतो–

"तुझा स्पर्शदेखील किती सुंदर असला पाहिजे ! तू जेव्हां स्मित करतेस तेव्हां तुझ्या उष्ण श्वासात माझा श्वास मिसळावा असे मला किती पण वाटतें ! पण आतां त्याचा काय उपयोग आहे ? ईव्ह तुझी नि माझी भेट फार उशिरां झाली."

ईव्ह म्हणते– "तुझ्याबरोबर जिवत होऊन क्षणभर नृत्य करण्यास मला मिळेल तर त्यासाठीं माझा आत्मा पणाला लावण्यास मी तयार आहें."

"तुझा आत्मा ?"

"होय. त्याशिवाय आतां आपणाजवळ आपलें असें दुसरें आहे काय ?"

पॅरी पुन्हां तिला आपल्या बाहुपाशांत घेतो. आणि तीं दोघें नृत्य करूं लागतात.

क्षणभर त्यांचे डोळे मिटतात आणि कसल्यातरी दिव्य प्रत्ययानें त्यांची समाधि लागते. आणि मग एकाएकी एक चमत्कार घडतो !

उपाहारगृहांतील तें नृत्याचें दालन नाहीसें होतें. आणि त्यांच्या सभोंवतीं मृतात्म्यांची वसाहत उमटूं लागते. ते दोघेहि मृतात्म्यांच्या कचेरीजवळच्या रस्त्यावर नृत्य करूं लागतात. पॅरी आणि ईव्ह यांच्या लक्षांत हा फरक येतांच ते आपलें नृत्य थांबवतात.

ईव्ह म्हणते– "मला तुला सोडून गेलें पाहिजे. कोणीतरी माझी वाट पहात आहे, असें मला वाटतें."

या रस्त्याच्या टोंकाला असलेल्या मृतात्म्यांच्या कचेरीकडे बोट दाखवून पॅरी म्हणतो–

"आपणां दोघांना तिकडून बोलावणें आलें असलें पाहिजे !"

हळू हळू नृत्यगृहांतील स्वरसंगीत अस्पष्ट होत जातें. आणि ईव्ह व पॅरी कचेरीच्या दाराशी येतांच, घंटा किणकिणते आणि दार करकरतें......

## मृतात्म्यांच्या कचेरींत–

पूर्वीचीच ती प्रौढ स्त्री मेजावर कोपर टेकून कोणाची तरी वाट पहात बसली आहे. तिच्या समोरचें खातें पुस्तक मिटवून ठेवलें आहे. तिचा लाडका काळा बोका त्यावर वेटोळून पूर्वीप्रमाणेच गुरगुरत बसला आहे.

ईव्ह आणि पॅरी किंचित् दबकत या दालनांत प्रवेश करतात, आणि बाईसमोर येऊन उभे राहतात. त्यांना पाहतांच बाई उद्‌गारते–

" या–तुमचीच वाट पहात होतें मी ! पाच मिनिट उशीर झाला तुम्हांला."

" तुम्हीच आम्हांला बोलावलं होतं काय ?" पॅरी विचारतो.

बाई मान हलवून होय म्हणते. शेजारच्या ग्रंथराजीतून ती एक लठ्ठ पुस्तक बाहेर काढते. आणि त्यांतून खूण घातलेलें पान ती उघडते. एकाद्या कोर्टातल्या कारकुनाला साजेलशा रुक्ष आणि कर्कश स्वरांत ती त्या पानावरील मजकूर वाचून दाखवू लागते–

**–कलम १४०–**

" एकमेकांसाठी जन्माला आलेल्या कोणत्याहि स्त्री–पुरुषांची, जर त्यांच्या जिवंतपणी पृथ्वीतलावर भेट होऊं शकली नसेल, आणि जर या घटनेचा दोष सर्वस्वी जीवात्म्यांच्या व्यवस्थापकाकडे पोंचत असेल, तर अशा स्त्रीपुरुषांना आपले प्रेम सफल करण्यासाठीं आणि एकत्र संसार करण्यासाठीं, परत मृत्युलोकांत जाण्याची परवानगी मागतां येईल, आणि कांहीं अटीवर अशी परवानगी त्यांना देण्यांत येईल . . . " वाचून संपल्यावर बाई मान वर करते; विस्मयानें चकित झालेल्या त्या जोडप्याकडे आपल्या चष्म्यांतून दृष्टि टाकते–आणि म्हणते–

" यासाठीं तुम्ही इथं आला आहांत, समजलें ? "

पॅरी आणि ईव्ह एकमेकांकडे पाहतात. त्यांच्या चकित मुद्रेवर अत्यानंदाच्या लहरी उमटू लागतात.

" म्हणजे, तुमच्या म्हणण्याचा अर्थ .... " पॅरी घुटमळत विचारूं लागतो.

तोंच बाई त्यांना रोखून विचारते–

" तुम्हांला पृथ्वीतलावर पुन्हा परतण्याची इच्छा आहे का ? "

" होय–अगदीं आनंदानें जाऊं आम्ही ! " ईव्ह उद्गारते.

" पण हें शक्य आहे का ? " पॅरी शंका प्रदर्शित करतो–

बाई पूर्वीच्याच निर्विकारपणें म्हणते–" होय ! शक्य आहे ! त्यामुळें बऱ्याच गुतागुतीच्या भानगडी घडतील कदाचित ! तथापि तुमचा तसा आग्रह असेल तर तुम्हांला निश्चितपणें परत जाता येईल. "

पॅरी आनंदाने ईव्हकडे पाहतो–उतावेळपणानें तिचा हात हातांत घेतो. पण बाई आपणांकडे रोखून पहात आहे, हे लक्षांत येतांच तो लाजेनें दूर होतो.

एकाद्या सरकारी अधिकाऱ्याच्या थाटांत बाई प्रश्न करूं लागते.

" मॅडम चार्लीयर, पॅरी ड्यूमेनसाठीच विधात्यानें तुम्हाला जन्माला घातलें होतें अशी तुम्हांला खात्री आहे का? "

" होय बाई! " ईव्ह निश्चयानें उत्तरते–

पॅरीकडे वळून बाई विचारते– " आणि तुम्ही मॉशायर ड्यूमेन, मॅडम चार्लीयरसाठीच तुमचा जन्म झाला होता, असें तुम्हांलाहि वाटतें का? "

" होय–अगदीं खचित ! " पॅरी आत्मविश्वासानें उत्तरतो.

मग बाई खातेंपुस्तकांतील पानें पुटपुटत चाळू लागते– " कॅमस...... कॅरा......चार्लोट......चार्लीयर ! छान ! डा......डी......डू...... ड्यूमेन ! ठीक ! या वहींतील नोंदीवरून असं दिसतं, कीं तुम्ही दोघेहि अधिकृतरित्या एकमेकांसाठी जन्माला आलां होतां ! पण आमच्या कचेरीच्या जन्मविभागांत कांहींतरी गफलत झाली आणि तुम्हां दोघांचे जन्म भलत्याच ठिकाणीं घडले. त्यामुळें जिवंत असतांना तुम्हां दोघांची भेट होऊं शकली नाहीं ! "

पॅरी आणि ईव्ह एकमेकांकडे पाहून मंद स्मित करतात–

बाई क्षणभर आपल्या चष्म्यांतून त्यांना न्याहाळते आणि उद्गारते–

"मोठा छान शोभतो तुमचा जोडा–!" आणि पुन्हां त्या लठ्ठ पुस्तकांत लक्ष घालून काम आटोपण्याच्या दृष्टीनें त्यापुढील मजकूर स्वतःशींच वाचून ती त्यांना सांगू लागते–

"तुम्हांला घालण्यांत आलेल्या अटी पुढीलप्रमाणें आहेत–

(अ) तुम्ही परत जिवंत होऊन मृत्युलोकीं जाऊं शकाल. (ब) मृतात्म्यांच्या अवस्थेंत असतांना ज्या गोष्टीचें तुम्हांला ज्ञान झालेलें आहे तें तुम्ही जिवंत झालात तरी तसेंच कायम राहील. (क) पुन्हा जिवंत होण्याची ही सवलत आरंभीं फक्त चोवीस तासांपुरतीच मर्यादित राहील. (ड) या अवधींत सारें सत्त्व पणाला लावून, तुम्ही दोघें परस्परांचा पूर्ण विश्वास आणि परस्पराचें गाढ प्रेम संपादन करण्यांत यशस्वी झालात तर–तर असें प्रेममय जीवन संपूर्णपणें जगण्याचा तुम्हाला अधिकार प्राप्त होईल!" असे सांगून ती टेबलावरील घड्याळाकडे बोट दाखवून म्हणते– "जर या चोवीस तासांत–म्हणजे उद्या सकाळी १०–३० पर्यंत तुम्ही यशस्वी झाला नाहीत तर–"

प्राण एकवटून पॅरी आणि ईव्ह तिचे शब्द ऐकू लागतात, बाई पूर्वींच्याच निर्विकारपणें म्हणते– "या कालावधीनंतर तुमच्या दोघांत कसलाहि अंतराय शिल्लक उरला, तर मात्र तुम्हां दोघांनाहि परत माझ्या भेटीला यावें लागेल–आणि मृतात्म्यांच्या वसाहतीत तुम्हांला कायमचें नांदावें लागेल! समजलं?"

आनंद आणि भय या संमिश्र भावनेनें भारावून ईव्ह आणि पॅरी मान हलवून 'होय' म्हणतात.

मग ती प्रौढ स्त्री उठून गंभीर आवाजांत उच्चारते–

"आतां तुम्ही दोघे एक झाला आहांत–"

आणि मग हस्तांदोलनासाठी हात पुढें करीत किंचित् सौम्य आवाजानें ती त्या दोघांस म्हणते–

"मनःपूर्वक अभिनंदन!"

ईव्ह आणि पॅरी हस्तांदोलन करीत तिचे आभार मानतात–

आणि तिचा निरोप घेऊन दाराकडे जाऊं लागतात. मध्येंच पॅरीला कांहीं शंका येऊन मागें वळून तो विचारतो–

" माफ करा–पण मृत्युलोकातील माणसांना आम्ही असें एकदम परत आलेलों पाहून वाटेल तरी काय ? "

खातेंपुस्तक मिटवीत ती प्रौढ स्त्री मान हलवीत म्हणते–

" त्याची काळजी करण्याचें तुम्हांला कारण नाहीं ! कालचक्र किंचित् उलटें फिरवून, तुमच्या मृत्यूच्या वेळीं जशी परिस्थिति होती तशीच पुन्हां सिद्ध करण्याचे हुकूम सुटलेले आहेत. तुम्हाला पिशाच्च म्हणून कोणीहि मानणार नाही ! "

ईव्ह आणि पॅरी बाईचे आभार मानतात–

आणि एकमेकाला मोठ्या प्रेमानें बिलगून बाहेर पडतात–

## मृतात्म्यांच्या कचेरीबाहेर–

ईव्ह आणि पॅरी पूर्वीच्या छोटचा दिंडीदरवाज्यांतून बाहेर पडतात. दाराशीच पॅरीचा म्हातारा वाटाड्या नव्या आवकांची वाट पहात उभा आहे. कोणी एक प्रौढ वयाचा कामगारहि देवडीशी उभा आहे. पॅरी आणि ईव्ह बाहेर पडतांच म्हातारा नेहमीच्या सरावानें किंचित् खाली झुकून त्यांना म्हणतो– " मी तुमचें स्वागत करतों– "

तेवढचांत म्हातारा पॅरीला ओळखतो. आणि मग सलगीनें म्हणतो–

" कोण तुम्ही ? आणि पुन्हां इथें ? तुम्ही कांही तक्रारअर्ज दाखल केला होता काय ? "

" मी तुम्हांला ' मृतात्म्यांपैकी कोणाला परत पृथ्वीवर जातां येतं का '– असं विचारल्याचं आठवतं का ? आम्ही दोघंहि परत मृत्युलोकीं निघालों आहोंत. "

स्तब्ध उभा असलेला तो प्रौढ कामगार पॅरीचे शब्द ऐकून घाईनें पुढें येतो आणि विचारतो–

" तुम्हांला ही खास सवलत कशी मिळाली हो ?"

ईव्ह म्हणते–" १४० कलमान्वयें आम्ही मृत्युलोकीं जाणार आहोंत ! आम्हीं एकमेकांसाठीं निर्माण झालों होतों. पण 'जन्मविभागाच्या' गफ-लतीमुळं आमची आमच्या जिवंतपणी भेट होऊं शकली नाहीं. त्यासाठीं आम्हांला ही संधि देण्यांत आली आहे !"

" मी तुमचें मन:पूर्वक अभिनंदन करतों," म्हातारा त्याच्या शेजारी उभा असलेला तो कामगार आर्जवीपणानें म्हणतो–" माफ करा. पण तुम्ही खरेच मृत्युलोकीं परत जाणार आहात काय ?"

" होय ! कां बरं ?"

" मग तुम्ही माझें एक काम कराल काय ?"

" जरूर ! बोला, काय करूं मी तुमच्यासाठी ?"

" म्हणजे त्याचं असं आहे......मी दीड वर्षापूर्वी मृत्यु पावलों. माझ्या बायकोनें दुसरें लग्न केलें. लग्न केलें म्हणून फारसें बिघडलें नाही. पण माझी एक आठ वर्षाची छोटी मुलगी आहे. ती तिच्या नवऱ्याला आव-डत नाही. त्या दोघानाही ती नकोशी झाली आहे. तेव्हां तिला तिच्या घरांतून काढून दुसरीकडे कुठें तुम्ही ठेवू शकाल काय ?"

" तो तिला मारहाण करतो का ?" ईव्ह विचारते.

" होय ! अगदी दररोज ! तिच्या किंकाळ्या मला ऐकवत नाहींत; आणि मी तिच्यासाठी कांही करूं शकत नाही. माझी बायकोहि त्याला त्या पोरीचा खुशाल छळ करूं देते. ......"

पॅरी त्याच्या खांद्यावर थोपटत म्हणतो–

" आम्हांला काय करतां येईल, तें जरूर करूं !"

" अगदीं खरं सांगतां आहांत ना तुम्ही ?"

" होय, अगदीं खरं ! मी वचन देते तुम्हांला. तुम्ही कुठं राहतां बरं?"

कामगार आपला पत्ता पॅरीला समजावून सांगतो. पॅरी म्हणतो–

" कांहीं काळजी करूं नका ! त्या घरापासून मी जवळच राहतो. तुमचें काम मी स्मरणपूर्वक करीन."

आणि मग कामगार निघून जातो.

पॅरी ईव्हला बाहुपाशांत घेतो आणि पहिल्या प्रथमच तिला हलकेंच विचारतो--

" तुझं नांव काय ?"

" ईव्ह. आणि तुझं ? "

" पॅरी. "

आणि तो खाली वाकून तिचं चुंबन घेतो.

त्याबरोबर सृष्टि अेकदम अंधारून जाते. आणि ईव्ह आणि पॅरी यांच्या काळ्या आकृति दिसू लागतात आणि हळू हळू वातावरणांत त्याहि विरून जातात.

## उपनगरांतील रस्त्यावर–

उपनगरांतील रस्त्यावर पॅरीच्या सायकलचें चाक मोडून घरंगळत जातें. पॅरी धडपडत जमिनीवर कोसळला आहे. त्याच्या आजूबाजूला बरेचसे कामगार जमलेले आहेत.

एकाएकी पॅरी हालचाल करूं लागतो. आणि मान वर उचलून आजूबाजूला पाहतो.

सैनिकांचा अधिकारी तारस्वरांत ओरडतो–" रस्त्यांतून दूर व्हा. ".

पॅरी झटकन् भानावर येतो. तेवढ्यांत अेक कामगार ओरडतो– " लष्करशाही मुर्दाबाद ! "

अधिकाऱ्याच्या खुणेबरोबर दोन सैनिक आपल्या बंदुका रोखतात अधिकारी पुन्हां अेकदां ओरडतो–" मी तुम्हांला अखेरचा हुकूम देतों. रस्त्यांतून दूर व्हा. "

धोक्याची कल्पना येतांच पॅरी ताडकन् उठून उभा राहतो. आणि आपल्या सहकाऱ्यांना उद्देशून ओरडतो–" तुम्ही मूर्ख तर नाहीं ? "

त्याबरोबर बरेचसे कामगार पॅरीच्या मदतीला धांवतात. पॅरी रागानें ओरडतो–

"मूर्खांनो, अगोदर रस्त्यांतून दूर व्हा! त्यांनी बंदुका रोखलेल्या तुम्हांला दिसत नाहींत का?"

त्याबरोबर कामगार नाखुषीनें रस्त्यांतून दूर होतात. त्याच्या हातातून विटांचे तुकडे खालीं पडतात. मग सैनिकांच्या रोखलेल्या बंदुकाहि खाली वळतात. सैनिकांचा अधिकारी सैनिकांच्या तुकडीला हुकूम देतो– "आगे कूच!"

## ईव्हच्या शय्यागृहांत

ईव्हच्या देहावर ऑंद्रे कष्टी मुद्रा करून पांघरूण ओढीत आहे. आपल्या चेहऱ्यावर कांता–वियोगाचे दुःखी भाव काळजीपूर्वक उमटवीत ऑंद्रे ईव्हच्या शय्येपासून दूर होऊं लागतो. इतक्यांत त्याची नजर ईव्हच्या मुद्रेवर जाते–

आणि ऑंद्रे दचकतो. त्याची मुद्रा पांढरी फटक पडते. डोळे विस्फारून तो तिच्याकडे पाहू लागतो.

ईव्ह हलकेच मान हलवते. तिचे डोळे उघडतात. ती आपल्या पतीकडे पाहूं लागते.

तिच्या शेजारीच गुडघे टेकून तिचा हात हातांत घेऊन ल्युसेटा स्फुदत बसली आहे. ईव्ह तिच्याकडे ममतेनें दृष्टि टाकते. आणि मग पुन्हां ऑंद्रेकडे पाहून ती भेसूर अर्थपूर्ण हास्य करते. जणू तिला म्हणावयाचें आहे–"पाहिलस? मी काही अशी सहज मरणार नाही!"

## उपनगरांतील रस्त्यावर–

पॅरी पॅवलोच्या खांद्यावर रेलून आधार घेऊन उभा आहे. आजूबाजूला पुष्कळसे कामगार जमले आहेत. पॅवलो सुटकेचा निश्वास टाकीत पॅरीला म्हणतो–

"काय माणूस आहेस रे! चांगलं घाबरवून सोडलं होतंस तूं आम्हांला. मला वाटलं, त्यांनी तुझा निकाल लावला."

पॅरी आपल्या खांद्यावर कपडे फाटलेल्या जागीं हात लावीत म्हणतो–

" थोडक्यांत बचावलों. गोळीचा आवाज ऐकतांच मी सायकलवरून उडी मारली. आणि खाली सपशेल आपटलों –"

असें बोलून तो मंदपणें हंसतो. आपल्या मित्रपरिवारांत परत आल्याचा उल्हास त्याच्या मुखावर स्पष्ट दिसत आहे.

एक कामगार विचारतो–" तुम्हांला कांहीं मदत पाहिजे का ?"

" छे, छे. मदत कशाला ? मला काय झालंय ?"

असें म्हणून पॅरी आणि त्याच्या पाठोपाठ पॅवलो चालूं लागतात. जमलेल्या कामगारांची पांगापांग होऊं लागते. एक कामगार पॅरीची सायकल घेऊन चालू लागतो. दूरवर दिसणाऱ्या सैनिकांकडे मूठ हिसकत पॅवलो म्हणतो–

" आज मारे थाटांत चालले आहेत. पण उद्यां चांगला एकेकाचा नक्षा उतरेल."

पॅरी विचारमग्न होऊन म्हणतो–" उद्यां ? उद्यां कोणीहि कांहींहि करायचं नाहीं ! "

" काय म्हणालास ?" पॅवलो चकित होऊन विचारतो.

पॅरी मध्येंच थांबतो. रस्त्यावर पडलेली एक वीट तो जपून उचलतो. आणि हातांतल्या हातांत चाचपून पहात स्वतःशींच म्हणतो–

" बरीच जड आहे ही ! आणि खडबडीत देखील...... ! "

पॅवलो आणि तो दुसरा कामगार गोंधळून एकमेकांकडे पाहूं लागतात.

आणि मग पॅरी एकदम भानावर येतो. कामगाराच्या हातून सायकल घेत आणि तिजवर आरूढ होत पॅवलोला तो म्हणतो–

" सहा वाजतां डिक्सनच्या घरीं...... "

पॅवलो आणि तो कामगार विचित्र नजरेनें पॅरीकडे पाहूं लागतात. पॅरीचें सारेंच वर्तन त्यांना चमत्कारिक वाटतें. पॅवलो विचारतो देखील–

" पॅरी तुला बरं वाटतं ना ? मी तुझ्याबरोबर यायला नको ना ? "

" छे, छे, मुळींच काळजी करूं नकोस. मला कांहींसुद्धां झालेलं नाही ! " आणि पॅडल् मारीत तो दूर निघून जातो. त्याच्याकडे पाहत तो कामगार पॅवलोला म्हणतो–

"तुम्ही त्यांना असं जाऊं द्यायला नको होतं. त्यांची प्रकृति ठीक दिसत नाही."

पॅवलो क्षणभर स्वत:शींच विचार करतो. आणि कांहींसा निश्चय करीत म्हणतो–

"तुझी सायकल आण पाहूं ! "

कामगारानें दिलेली सायकल हातीं घेऊन तो घाईघाईनें पॅरीचा पाठलाग करण्यासाठी निघून जातो.

## ईव्हच्या शय्यागृहांत–

ल्यूसेटा अजूनहि ईव्हचा हात हातांत धरून बसली आहे. एकदम तिच्या हातांतला ईव्हचा हात हालचाल करूं लागतो. ल्यूसेटा एकदम दचकते; चकित होऊन ती ईव्हकडे पाहूं लागते. आणि एकदम ओरडते– " ईव्ह......ईव्ह......" आणि एकदम स्फुंदत ती ईव्हला मिठी मारते.

ईव्ह तिला मायेनें जवळ घेते. पण तिची कठोर नजर आपल्या नवऱ्यावर खिळली आहे. ल्युसेटा हुंदके देत अडखळत म्हणते–" ईव्ह...... किती घाबरवून सोडलंस तूं मला ! ......"

" वेडी कुठली–" ईव्ह तिला कुरवाळत म्हणते.

आँद्रे गलित–गात्र होऊन आ वासून पहातच उभा राहिला आहे. क्षणभरानें भानावर येऊन दाराकडे जात तो म्हणतो–" मी डॉक्टरला घेऊन येतो."

" आँद्रे, त्याची कांहीं सुद्धां जरुरी नाहीं ! " ईव्ह हुकमी आवाजांत म्हणते.

दारांतूनच आँद्रे गडबडीनें म्हणतो–" छे, छे. असें कसें होईल ? डॉक्टरला बोलावलेंच पाहिजे ! " आणि ईव्ह कांही म्हणण्याच्या आंत दार बंद करून तो बाहेर पडतो.

आँद्रे निघून जातांच ईव्ह आपल्या शय्येवरून चटकन् उठून बसते. आणि आपल्या बहिणीला म्हणते–" मला जरा आरसा आणून देतेस ? "

ल्यूसेटा तिच्याकडे विस्मयचकित होऊन पाहूं लागते.

ईव्ह म्हणते–" अशी पाहतेस काय ? त्या टेबलावरचा तो आरसा आणून दे मला."

ल्यूसेटा आरसा आणून तिच्यासमोर धरते. आरशांत आपलें प्रतिबिंब पहात ईव्ह स्वतःशीच पुटपुटते–" मी खरीच जिवंत झालें तर ! "

" काय म्हणालीस ? "

" कांही नाही ! " ईव्ह उत्तरते.

ल्यूसेटा अस्वस्थपणें बिछान्याच्या एका टोकाला बसली आहे. ईव्ह आरसा बाजूला ठेवते. तिचा हात हातांत घेऊन ईव्ह गंभीर मुद्रेनें पण प्रेमळ आवाजांत तिला विचारते–

" ल्युसेटा खरं सांग, ऑंद्रे आणि तू, तुमच्या दोघात काय भानगड आहे ? "

ल्युसेटा चकित होते, क्षणभर गोंधळते आणि मग प्रांजळपणें म्हणते– " आमच्या दोघांत ? कसली आलीय् भानगड ! तसलं कांही एक नाहीं. मला तो फार आवडतो इतकंच ! "

ईव्ह ल्यूसेटाच्या केसावरून मायाळूपणें हात फिरवीत म्हणते–

" त्यानं माझ्या पैशाकडे पाहून माझ्याशी लग्न केलं, हें तुला माहीत आहे का ? "

ल्यूसेटाला ईव्हचें बोलणें रुचत नाही. ती एकदम रागानें म्हणते– " ईव्ह...... "

" होय, तो माझा अत्यंत तिरस्कार करतो ल्युसेटा. मी त्याला नकोशी झालें आहे ! "

" ईव्ह, असलं बोलणं तुला शोभत नाही ! तूं आजारी असतांना त्यानं तुझ्यासाठी आलोचन जागरणें केलीं आहेत. हें विसरलीस का ?" ल्युसेटा ईव्हपासून फणकाऱ्यानें दूर होत म्हणते.

" माझ्याशी तो किती वेळां अप्रामाणिक झाला आहे याची तर गणतीच नाही ! ऊठ. तें कपाट उघड ! त्या कपाटांत अनेक स्त्रियांकडून ऑंद्रेला आलेल्या प्रेमपत्रांचा ढिगारा तुला पहायला मिळेल. "

संतापानें ल्युसेटा ताडकन् उभी रहात ईव्हला म्हणते–

" ईव्ह, असलं बोलणं तुला शोभत नाहीं."

" तू स्वतःच्या डोळ्यांनी पहा, म्हणजे मी काय म्हणतें त्याची तुला प्रचीति येईल." असं म्हणत ईव्ह अंथरुणांतून उठून ताडकन् उभी राहते तिला उठून उभी राहिलेली पाहून ल्यूसेटा घाबरून जाते. ती क्रोधानें ओरडते–

" ऑंद्रेच्या कागदपत्रांना त्याच्या अपरोक्ष हात लावण्याचा हलकटपणा मी करणार नाही. माझा तुझ्यावर विश्वास नाहीं. तुझ्यापेक्षां ऑंद्रेला मी चांगली ओळखतें. तो असं कधीं कधी करणार नाही."

ईव्ह जवळ जाऊन ल्यूसेटाच्या खांद्यावर हात ठेवते. तिच्या नजरेला नजर भिडवून रोखून पाहते. आणि मग किंचित् उपरोधानें म्हणते–
" माझ्यापेक्षां तूं त्याला जास्त ओळखतेस अं ? माझ्यापेक्षां त्याला 'अधिक' ओळखण्याइतपत तुमचे संबंध पुढें गेलेले आहेत तर ? मग ऐक तर– त्यानं मला काय केलं तें तुला ठाऊक आहे ?"

" मला कांहींसुद्धां ऐकायची जरुरी नाहीं ! तुझ्या अंगांत सणसणून ताप आहे. वाताच्या भरांत तूं मला मारशील देखील......"

" ल्यूसेटा......"

" एक अक्षर बोलू नकोस !"

असं म्हणून ईव्हला दूर ढकलून ल्यूसेटा दुसऱ्या दालनांत तडकाफडकीं निघून जाते.

ईव्हचे हात खालीं पडतात. आणि ती अपरंपार कारुण्यानें ल्यूसेटाच्या जाणाऱ्या मूर्तीकडे पाहूं लागते.

## ईव्हच्या बंगल्यासमोर–

ईव्हच्या बंगल्यासमोर येऊन पॅरी घुटमळत थांबतो. तिच्या बंगल्यावरील क्रमांक बरोबर आहे याची तो पुनःपुन्हा खात्री करून घेतो. बंगल्याच्या फाटकांतून तो आंत शिरणार तोंच आंतून दोघ लष्करी अधिकारी

बाहेर पडतात. पॅरी त्यांच्याकडे लक्षहि देत नाहीं. ते निघून जातांच पॅरी आंत शिरतो.

त्याच वेळीं रस्त्याच्या दुसऱ्या टोंकाला उभे राहून पॅवलो विस्मय-चकित मुद्रेनें ही घटना पहात आहे.

पॅरी पोर्चच्या पायऱ्या चढून व्हरांड्यांत येतो. आणि देवडी-वाल्याजवळ चौकशी करतो—

" मॅडम चार्लीयर घरीं आहेत का ?"

" डावीकडून तिसरी खोली." देवडीवाला तुटकपणें उत्तरतो.

पॅरी दार उघडतो आणि समोरच्या भव्य जिन्यावर जाऊं लागतो. तेवढ्यांत देवडीवाला तिरस्कारानें त्याच्या अंगावर ओरडतो— "अहो मेहेरबान, नोकराचाकरांचा जिना मागच्या बाजूनें आहे, म्हटलं !"

त्याबरोबर पॅरी भडकतो, दुरुत्तरें करण्यासाठीं त्याचे ओठ फुरफुरूं लागतात. पण तेवढ्यांत तो आपलें मन संयमानें आवरतो. देवडीवाल्यानें दाखविलेल्या रस्त्यानें तो वर जातो.

## ईव्हच्या शय्यागृहांत—

आरशासमोर उभें राहून ईव्हनें वेषभूषा नुकतीच आटोपली आहे, कुठेंतरी जाण्याच्या ती गडबडींत आहे. तिनें अंगांत अेक साधाच सूट चढविला आहे. आपला फरचा मखमली कोट तिनें अंगांत घालण्यासाठीं शय्येवर काढून ठेवलेला आहे.

इतक्यांत दारावर थाप ऐकू येते. ईव्ह चटकन् वळून म्हणते—

" कोण आहे ? "

तेवढ्यांत ईव्हची नोकराणी आंत येत सांगते—"बाईसाहेब, कोणी एक इसम बाहेर आला असून आपल्याला जरुरीनं भेटायचं आहे, असं तो म्हणतो आहे. त्याचं नांव पॅरी ड्यूमेन."

त्याबरोबर ईव्ह दचकते. तिच्या मनाचा गोंधळ उडतो. आणि ती घाईघाईनें नोकराणीला म्हणते—

"कुठं, कुठं आहे तो ?"

"मी त्याला बाहेर उभा केला आहे."

"हात वेडे ! त्याला बाहेर का उभा करायचा ? जा त्याला आंत घेऊन ये !"

नोकराणी निघून जातांच ईव्ह दोन्ही हातांनी आपला चेहरा झांकून घेते. आणि घडलेल्या साऱ्या गोष्टी आठवण्याचा प्रयत्न करते. मग ती घाईनें आरशासमोर जाते, आणि पावडरचें फूल उचलत मनाशीं कांहीं अेक निश्चय करते.

तेवढ्यांत दार वाजतें. आणि पॅरी तिच्यासमोर येऊन उभा राहातो. अेकमेकांना पहातांच दोघांनाहि भरतें येतें, आणि दोघेहि गोंधळून जातात. पॅरी किंचित् हंसून चाचपडत कांहींतरी बोलू लागतो.

पण दोघेहि गोंधळले आहेत हेंच खरें. दोघेहि अस्वस्थपणें एकमेकां-कडे पहातात. पण दोघांच्या अस्वस्थपणांत थोडा फरक आहे.

पॅरीच्या अस्वस्थपणांत न्यूनगंडाची भावना आहे. तर ईव्हच्या साऱ्या वृत्ति फुलून आल्यासारख्या झाल्या आहेत. मग कांहीतरी बोला-यचं म्हणून ईव्ह म्हणते–

"तूं नोकराचाकरांच्या जिन्यांतून कां बरं वर आलास ?"

पॅरीचा चेहरा लज्जेनें लाल होतो. तो अडखळत म्हणतो– "ऊं ! त्यांत काय बिघडलें ?"

तेवढ्यांत दार उघडून ल्युसेटा आंत येते. पॅरीला पहातांच ती दचकून म्हणते– "माफ करा हं."

पॅरी आणि ईव्ह शेजारीं शेजारीं उभे आहेत. ल्यूसेटा क्षणभर त्या दोघांकडे विचित्र नजरेनें पहाते. आणि मग आंत दुसऱ्या दालनांत निघून जाते. जातां जातां ती पुन्हां एकदां वळून पाहते. त्या वेळीं ईव्हनें पॅरीचा हात हातांत घेतला आहे, असें तिला दिसतें. त्याबरोबर तिला धक्काच बसतो; आंतमध्यें जात आपल्या मागें ती दार जोरानें आदळते.

पॅरी आणि ईव्ह अनिमिष नेत्रांनीं एकमेकांना न्याहाळत आहेत. ईव्ह त्याला मायेनें म्हणते– " बस ना. उभा किती वेळ राहणार तू ? "

एका खुर्चीवर बसण्यासाठी पॅरी वळतो आणि मग आपला विचार बदलत तो तिला म्हणतो–

" नको, मी उभाच राहतों ! "

आणि मग येरझारा घालीत खोलीतील एकंदर थाटमाट पहात तो तिला म्हणतो–

" इथं राहतेस का तू ?"

" होय. पण...... "

पॅरीच्या कपाळावर कडवट आंठ्या उमटतात, आणि तो उद्‌गारतो

" अस्सं ! "

ईव्ह आपल्या शय्येवर बसते. आणि मग सहजगत्या पॅरी आराम-खुर्चीवर बसतो. आणि मग एकाएकी ईव्ह हंसू लागते. तिला हंसतांना पाहून पॅरीला आश्चर्य वाटतें. तो किंचित् उद्वेगानें विचारतो––

" हंसायला काय झालं ?"

आपलें हंसू आवरीत ईव्ह उत्तरते– " हंसू नको तर काय ? तू एखादी औपचारिक भेट द्यायला आलेल्या माणसासारखा वागतो आहेस."

पॅरी मंद स्मित करतो. आणि मग तो खोलींतल्या वैभवशाली वस्तूंचें निरीक्षण करूं लागतो. ईव्ह त्याच्या मुद्रेवर टक लावून पाहूं लागते. आणि मग एकाएकी स्वतःशीं निश्चय करीत तो तिला म्हणतो– " ईव्ह, तुला माझ्याबरोबर आलं पाहिजे."

ईव्ह काळजीनं विचारते–" कुठं ? "

" कुठं म्हणजे–माझ्या घरीं ! "

" तुझ्याबरोबर येणं मला खचित आवडेल. तूं सांगशील तिकडे येईन मी पॅरी ! पण असं तडकाफडकी नव्हे ······ "

" मला वाटलेंच होतें ! ...... मृतात्म्यांच्या राज्यांत प्रेम करणं निराळं आणि इथं जिवंत माणसांच्या सृष्टीत प्रेम करणं निराळं ! इथं या साऱ्याच गोष्टींचा माणसाला विचार करावा लागतो. " असं म्हणत पॅरी सहजगत्या ईव्हचा फरकोट हातीं घेतो.

"या साऱ्या गोष्टी ? कोणत्या गोष्टी ? " ईव्ह विचारते.

पॅरी किंचित उपहासानें म्हणतो–" हे गालिचे, हे मौल्यवान् फर्निचर, या गाद्यागिरद्या, हे दागदागिने आणि छानदार कपडे ...."

ईव्ह मोठ्या मायेनें पॅरीचा हात हातांत घेऊन दाबत म्हणते–

" हीच का माझी पारख केलीस तू ? हाच का तुझा माझ्यावरचा विश्वास ? तू सांगतोस ती अेकहि गोष्ट मला इथं अडवून धरूं शकणार नाही. मला इथं रहावसं वाटतं तें माझ्या बहिणीसाठीं ! मला तिचं रक्षण केलं पाहिजे. "

पॅरी खिन्नपणें म्हणतो. " जशी तुझी मर्जी ! "

ईव्ह पॅरीच्या मुद्रेवरील कडवटपणा पाहून म्हणते–

" तुला अेवढंसुद्धां कसं समजत नाहीं रे ! तू अगदी दुष्ट आहेस बघ. "

परंतु तिच्या अनुनयाला पॅरी बधत नाही. मग ती आर्जवी स्वरांत त्याला विनवते–

" पॅरी आपण अेकमेकांशीं भांडून कसं चालेल ? आपल्याला थोडा-सुद्धां वेळ गमावतां कामा नये. "

इतक्यांत दार उघडून आपली हॅट हातांत घेत आँद्रे आंत प्रवेश करतो. त्याच्या मागें ल्यूसेटा उभी आहे. बहुधा तिनं आपल्या बहिणीच्या विचित्र वर्तनाची हकीकत त्याच्या कानावर घातली असावी. आँद्रे रुक्षपणें म्हणतो– " पांच मिनिटांत डॉक्टर येतील ! "

ईव्हनें अजूनहि पॅरीचा हात आपल्या हातांत ठेवला आहे. ती किंचित् उपहासानें हंसून म्हणते–" आँद्रे, तूं उगीचच ही तसदी घेतलीस. मला कांहीं सुद्धां झालेलं नाहीं. मरण माझ्यापासून दूर गेलें आहे, एवढेंच नव्हे, तर माझी प्रकृति आतां खडखडीत बरी झाली आहे. "

तिच्या उत्तरानें आँद्रे चकित होतो. पण उपरोधानें तो म्हणतो–" तें तर दिसतंच आहे. " आणि आपली हॅट खुर्चीवर ठेवत तो म्हणतो–" या इसमाशीं तू माझी ओळख करून देणार नाहींस का ? "

" त्याची कांहीं जरुरी नाहीं ! "

मग आँद्रे पॅरीला न्याहाळत किंचित् विस्मयानें म्हणतो–

" त्याची कांहीं विशेष जरुरी आहे असें नव्हे. पण अेकूण आपले दोस्त मात्र तूं छान निवडलेस ! "

त्याबरोबर पॅरी भडकून दोन पावलें पुढें होतो. पण ईव्ह त्याला आवरत म्हणते–

" पॅरी.... "

त्याबरोबर आँद्रे उपरोधानें हंसून म्हणतो–

" अस्सं; म्हणजे 'पॅरी' म्हणून हांक मारण्यापर्यंत तुझी मजल गेली तर ? "

" आँद्रे, तुला काय समज करून घ्यायचा तो तूं खुशाल करून घे ! पण ल्यूसेटाच्या समोर मी तुला असं बोलूं देणार नाहीं. "

" या गोष्टी मला सांगण्यापेक्षा तू स्वतःलाच सांग ! तूं आपले जिवाचें प्यार वाटेल त्या उकिरड्यावरून उचलण्यास स्वतंत्र आहेस. पण त्यांना माझ्या घरांत भेटण्यास मात्र माझी हरकत आहे. ह्या गोष्टी ल्यूसेटासमोर चालू शकतात नाहीं का ? "

ईव्ह पॅरीला आवरत, म्हणते– " आँद्रे, मुद्दाम दुष्टपणानं साऱ्या गोष्टी तू विकृत करून दाखवतो आहेस. "

तेवढ्यांत पॅरी आँद्रेच्या जवळ जातो, आणि त्याचा कोट धरतो. पण आँद्रे दुष्टपणें हांसत त्याला म्हणतो–

" अहो मेहेरबान, आम्ही सुसंस्कृत लोक असें वाटेल त्याच्याशीं हमरीतुमरीवर येत नाहीं, समजलांत ? "

पॅरी कांहीं अतिप्रसंग करणार तोंच ईव्ह त्याला पुन्हां ओढते. ल्यूसेटा तेवढयांत आँद्रेला बिलगते. तिला उद्देशून ईव्ह आपला हात पुढें करीत म्हणते —

" ल्यूसेटा इकडे ये. "

तिनें पुढें केलेला हात झिडकारीत ल्यूसेटा ओरडते– " हात लावूं नकोस माझ्या अंगाला. "

त्याबरोबर ईव्ह ल्यूसेटाकडे एकदां निराश होऊन दृष्टिक्षेप टाकते. आणि मग ती पॅरीला निश्चयी मुद्रेनें म्हणते–

" मी तुझ्याबरोबर यावं असं तुला वाटतं ना? ठीक आहे! चल, जाऊं या आपण! आतां मला या घरांत थांबण्यासारखें कांहीं उरलें नाहीं! " आणि मग आपला कोट आणि बॅग हातामध्यें घेत, पॅरीचा हात हातीं धरत, या दालनांतून ती बाहेर पडते. ल्युसेटाला जवळ घेत, ईव्हला ऐकू जाईल अशा स्वरांत आँद्रे दुष्टपणें म्हणतो–

" छान! आपल्या बहिणीस छान उदाहरण घालून दिलेस! "

## ईव्हच्या बंगल्यासमोर–

ईव्हच्या घरापासून सुमारें शंभर पावलांवर एका झाडाला टेकून पॅवलो सिगरेट ओढत उभा आहे. एकाएकीं तो दचकतो, आणि डोळे विस्फारून बघूं लागतो. आणि घाईघाईनें झाडाच्या आड दडतो.

ईव्ह आणि पॅरी बंगल्यांतून बाहेर पडतात, आणि चालूं लागतात. पॅवलो त्यांच्याकडे क्षणभर पहातो. आणि मग सायकल हातीं घेऊन तो त्यांचा पुन्हां पाठलाग करूं लागतो.

ईव्हची मुद्रा किंचित् निश्चयी पण दुःखी दिसत आहे. चालतां चालतां सहजगत्या ती पॅरीचा हात आपल्या हातांत घेते. पॅरी शांतपणें तिला न्याहाळूं लागतो. तिच्या डोळयांत अश्रू तरळतांना त्याला दिसतात. आपल्या हातांतला तिचा हात मोठ्या प्रेमानें दाबत तो तिला म्हणतो–

" ईव्ह, अशी दुःखी होऊं नकोस. "

मायेच्या या साध्या शद्वांनीं तिच्या डोळयांतून घळघळां अश्रू वाहूं लागतात. ती थांबते आणि आपलें तोंड हातांनी झांकीत हुंदके देत रडू लागते.

पॅरी तिला जवळ घेतो आणि मायेने तिच्या केसांवरून हात फिरवीत तिला म्हणतो–

" ईव्ह, तुझ्या डोक्यांत अजूनहि तुझ्या बहिणीचा विचार चालला आहे; होय ना ? "

ईव्ह न बोलता अधिकच हुंदके देऊन रडू लागते.

पॅरी तिला पुन्हां म्हणतो– " तुला तुझ्या बहिणीकडे पुन्हा परत जाण्याची इच्छा आहे काय ? "

ईव्ह मानेनें 'नाही' म्हणने.

मग पॅरी विचारतो– " माझ्याबरोबर आल्याचा तुला खेद तर वाटत नाही ना ? "

ती मान वर करते आणि अश्रुपूर्ण नेत्रांनी त्याच्याकडे पहात म्हणते–

" असं कां बोलतोस तू, पॅरी ? खेद करून मला कसं चालेल ? आतां तर साऱ्या गोष्टींना कोठें आरंभ झाला आहे..... "

ईव्ह पुन्हां त्याचा हात हातीं घेते. आणि ते दोघे चालू लागतात.

मध्यंेच पॅरी कठोर स्वरांत तिला विचारतो–" त्या माणसावर तुझं प्रेम होतं का ? "

" मुळीच नाही ! "

" पण तू तर त्याच्याशी लग्न केलं होतंस ! "

" त्या वेळी तो मला आवडत होता. "

" तुला आवडला तो इसम ? "

" माझी बहीण आज आहे त्या पेक्षां मी त्यावेळीं लहान होतें. माझं हिताहित कळत होतं कुठं मला ? "

पुन्हा कांहीं वेळानें पॅरी म्हणतो–

" ईव्ह, या गोष्टी आपल्याला फार तापदायक होणार आहेत. "

" कुणाबद्दल म्हणतो आहेस तू ?"

" आपल्या दोघांबद्दल बोलतो आहें मी. "

त्याबरोबर ती त्याला थाबवते. आणि त्याचे दोन्ही हात हातांत धरून त्याच्या नजरेला नजर देत ती म्हणते--

" छे, छे. पॅरी असं बोलू नकोस. आपण पूर्वीप्रमाणेच एकमेकांवर गाढ विश्वास ठेवला, तर कोणत्याहि गोष्टी आपणाला तापदायक होणार नाहीत."

तो मान वळवून दुसरीकडे पाहूं लागतो. आणि पुटपुटतो–

" पूर्वीच्या गोष्टी निराळ्या होत्या !"

" पॅरी, पॅरी तुला माझ्यावर विश्वास ठेवायला हवा." किंचित् मंद स्मित करून ईव्ह म्हणते– " आपल्याला सारं पुन्हां पहिल्यापासून सुरू करायला हवं...."

## उद्यानांत–

पॅरी आणि ईव्ह एकमेकांच्या हातांत हात घालून पूर्वीच्याच हिरवळीवरून त्या आंधळ्या भिकाऱ्याजवळून चालले आहेत. त्यांच्या कानीं अलगुजाचे स्वर पडतात. पण त्यावर वाजविली जाणारी गत आतां निराळी आहे. ईव्ह पॅरीला खुलविण्यासाठीं किंचित् आनंदी मुद्रा करून म्हणते–

" तूं ऐकलंस का ?"

" त्या आंधळ्या भिकाऱ्याचा पावाच ना ?"

" गरीब बिचारा....तुला आठवतं का ? आपल्याला त्याच्या शरीराबद्दल असूया वाटली होती." असं म्हणून ती मनःपूर्वक हंसते. पण पॅरी पूर्वीच्याच गंभीरपणानं म्हणतो–

" पण हे स्वर कांही पूर्वीचे नाहींत."

ईव्ह आपल्या पर्समधून एक नाणें काढून त्या भिकाऱ्याच्या झोळीत टाकते. आणि म्हणते–

" तू दुसरी एकादी गत वाजवशील का ?"

भिकारी तिला आशीर्वाद देतो आणि तो ईव्ह आणि पॅरी यांनीं मृतावस्थेंत ऐकलेली गत आपल्या अलगुजावर वाजवूं लागतो.

ईव्ह स्मित करीत पॅरीला बिलगत म्हणते—

" आतां सारं कांहीं पूर्वीसारखं झालं कां नाहीं ?"

पॅरी हंसतो आणि म्हणतो— " त्याच्या वाजवण्यांत पूर्वीची ती गोडी कोठें शिल्लक उरली आहे ?"

" तो मावळतीचा सूर्य पाहिलास काय ? तो तरी पूर्वीचाच आहे ना ? " ईव्ह विचारते. पॅरी प्रसन्नपणें हंसत म्हणतो— " होय ! आणि शिवाय तुझा हात हातीं घेतांना तुला स्पर्श करण्याचं केवढं मोठं सुख या वेळीं मला प्राप्त झालेलं आहे ! "

ईव्ह आणि पॅरी प्रणयाचं हितगुज करीत त्या पायरस्त्यावरून पुढं जाऊं लागतात. हळू हळू पूर्वीच्या उपाहारगृहांतून नृत्यसंगीत त्यांच्या कानावर पडूं लागतें. उपाहारगृहाच्या दाराशीं येऊन ते पोंचत आहेत, तोंच घोड्यावरून खालीं उतरणारी ती देखणी तरुणी आणि छानछोकीच्या पोशाखांतील तिचे दोस्त त्यांच्या दृष्टीला पडतात.

" चल आपण आंत जाऊं या ! " पॅरी ईव्हला म्हणतो. मग दोघेहि आंत जाऊं लागतात. उपाहारगृहांत बसलेल्या माणसांचा समुदाय पाहतांच ईव्ह क्षणभर गांगरते आणि घुटमळते. पॅरीच्या तें लक्षांत येतांच तो विचारतो— "कां ? घुटमळायला काय झालं ? "

" छे कांहीं नाहीं ! " ईव्ह उत्तरते. आणि मग जणूं कांहीं, कांहींच घडलें नाहीं, असें दर्शवीत पॅरीचा हात हातांत घेऊन ती आंत प्रवेशते. रिकाम्या टेबलाच्या शोधांत दोघेहि दालनांतून हिंडूं लागतात.

घोड्यावरून आलेल्या त्या देखण्या तरुणीच्या हाताचें कोणी एक तरुण दरबारी थाटांत वाकून चुंबन घेतो, आणि दुसरा एक गृहस्थ मोठ्या अदबीनें तिच्यापुढें खुर्ची करूं लागतो.

ईव्ह आणि पॅरी त्यांच्या समोरून जाऊं लागतांच, या खेपेला त्यांच्या पैकीं एक इसम अर्धवट उठत तिला ओळख देऊं लागतो. पण तेवढ्यांत ती झटदिशीं पुढें निघून जाते.

छान छोकीच्या पोशाखांतील ती मंडळी आपापसांत कुजबुजूं लागतात.

"कोण रे ती ?"

"म्हणजे ? तुला माहीत नाहीं ? ईव्ह चार्लीयर !"

"ईव्ह चार्लीयर ? मग ती ह्या इसमाबरोबर इथं कशी ?"

"तेंच तर कांहीं कळत नाही !"

पॅरी आणि ईव्ह एका टेबलाजवळ जातात. तों तेथें प्रेमिकांचें एक जोडपें बसलें आहे. ईव्ह त्यांना ओळखते आणि हंसते. जणूं त्यांनीं देखील पूर्वीची ओळख द्यावी अशी तिची अपेक्षा आहे.

पॅरीच्या मुखावर स्मित झळकतें. परंतु प्रेमिकांचें जोडपें त्यांच्या या विचित्र वर्तनाचा अर्थ न उमजून डोळे विस्फारून पाहूं लागतें. ईव्ह आणि पॅरी शेजारच्याच एका टेबलाकडे वळतात. आणि त्या प्रेमिकांकडे तोंड करून बसतात.

त्या दोघां प्रेमिकांना आतां ईव्ह आणि पॅरीची अडचण वाटूं लागते. पण कसेंबसें ते आपलें संभाषण चालू ठेवतात, इतक्यांत उपाहारगृहांतील नोकराणी पुढें येऊन अदबीनें विचारते–

"आपण काय घेणार बाई ?"

"चहा."

"आणि तुमच्याबरोबर आलेले हे गृहस्थ ?"

पॅरी अडखळतो, गोंधळतो आणि बोलून जातो– "मीदेखील चहाच घेईन."

"चिनी पद्धतीचा कीं सिलोनी पद्धतीचा ?" नोकराणी पॅरीला विचारते.

पॅरी डोळे विस्फारून पाहूं लागतो.

"काय म्हणालीस ?"

ईव्ह चटकन् मध्यें पडत म्हणते– "आम्हां दोघांनाहि सिलोनी पद्धतीचा चहा हवा !"

नोकराणी निघून जाते. अन् पॅरीला स्वतःच्या गोंधळाची गंमत वाटून तो मनःपूर्वक हंसतो. ईव्ह आणि पॅरी पुन्हा त्या प्रेमिकांकडे पाहूं

लागतात. ते प्रेमिक मंत्रमुग्ध झाल्याप्रमाणें एकमेकांकडे टक लावून पाहूं लागतात. तो तरुण आपल्या प्रेयसीचा हात हातांत घेऊन चुंबन घेतो. जणूं एखादा अमोल ठेवा हाती आल्यासारख्या त्याच्या वृत्ति बहरून गेल्या आहेत.

ईव्ह आणि पॅरी एकमेकांकडे पाहून स्मित करतात. मग हळूंच ईव्ह आपला हात पुढें करते. जणू तिनें पॅरीला आवाहनच केलें आहे. पॅरी हलकेंच तिचा हात हातांत घेतो. त्याचा दुसरा हात आपल्या हातांत घेत ईव्ह न्याहाळू लागते, आणि म्हणते–

"तुझा हात मला फार आवडतो. पण हा एवढा मोठा व्रण कसला रे?"

"ऊं! मी चवदा वर्षाचा असतांना मला एकदां अपघात घडला होता."

"काय करत होतास त्या वेळीं तूं?"

"त्या वेळीं मी कारखान्यांत उमेदवारीच्या कामावर होतो. आणि तूं?"

"मी चवदा वर्षाची असतांना? त्या वेळीं मी शाळेंत जात होते."

अेकाअेकी चपापून आपला हात मागें घेत पॅरी तिला म्हणतो.–

"तुझ्या ओळखीच्या लोकांचे डोळे आपल्यावर खिळले आहेत पहा!"

आणि खरोखरच छानछोकीच्या पोषाखांतील तीं माणसें विचित्र नजरेनें ईव्ह आणि पॅरी यांच्याकडे पाहत आहेत. त्यांपैकी कोणी एक तरुण आणि ती तरुणी एकमेकांचा हात हातांत धरून ईव्ह आणि पॅरीची नक्कल करूं लागतात. आणि बाकीचे बघे उपहासानें खदखदतात. ईव्ह कठोरपणें त्यांच्याकडे नजर टाकते आणि म्हणते–

"तीं माणसें माझीं कोणीं नव्हत; आणि मी त्यांची कोणी नव्हे."

ईव्ह पुन्हां त्याचा हात आपल्या हातांत घेते. खालीं वाकून पॅरी आपले ओठ तिच्या हातावर ठेवतो. या वेळीं त्या प्रेमिकांची नजर त्यांच्यावर खिळली असल्याचें त्याच्या लक्षांत येतें. तो थबकतो, गोंधळतो,

आणि भडकतो. ईव्हलाहि कांही चमत्कारिक वाटून ती आपला हात मागें घेते. पॅरीला आश्चर्य वाटतें. पण ईव्ह खुणेनें त्या प्रेमिकांच्या कडे बोट दाखवते. आणि मग ते प्रेमिकहि आपली जागा सोडून दुसरीकडे जाऊन बसतात. ईव्ह म्हणते–

"मला वाटलं होतं तितकें कांहीं हें जोडपें देखणें दिसत नाहीं. आपण त्यांना उगीचंच अवघडल्यासारखं केलं झालं !"

"तसं नव्हे ! मला वाटतं तुझ्या ह्या ओळखीच्या लोकांनींच आपल्याला अवघडल्यासारखं केलेलं आहे."

"म्हणजे, मी नाहीं समजलें ?"

"तुला माहीत आहे....माझ्यासारख्या माणसाबरोबर तुला इथं येतांना ते आज पहिल्यांदाच पाहत असावेत."

"त्यांच्या वाटण्याशीं मला काय करायचं आहे ?"

"खरंच, तुला माझ्याबरोबर येण्यांत शरमिंदेपणा वाटला नाहीं ना?"

"असं बोलतांना तुला शरम वाटायला हवी !" ती कठोरपणानं म्हणते. आणि मग आजूबाजूच्या माणसांकडे एक उपहासाची दृष्टि फेकत ती चटकन् उठत पॅरीला म्हणते–

"चल, आपण नृत्य करूं या."

"या वेळीं ?" खुर्चीवरून उठत पॅरी म्हणतो — "आपण एकटच्यानंच नृत्य करायचं का ?"

"इतरांशीं आपल्याला काय करायचं आहे ?"

"पण एकदम् नृत्य करण्याची तुला कां इच्छा झाली ?"

"कारण तुझ्याबद्दल मला किती आदर वाटतो, तें तरी या साऱ्या माणसांना त्यामुळें दिसेल!"

पॅरीचा हात हातांत धरून ईव्ह नृत्यस्थानाकडे जाऊं लागते. जातां जातां छानछोकीच्या पोषाखांतील मंडळीकडे ती तिरस्कारानें दृष्टिक्षेप टाकते. त्यापैकीं कोणी एक इसम वात्रटपणें कोटाची कॉलर उंचावून

६

कांही फाजील कोटी करतो. त्याबरोबर जमलेल्या साऱ्या माणसांतून प्रचंड हंशा उसळतो.

पॅरी आणि ईव्ह नृत्यस्थानावर नृत्य करूं लागतात.

ईव्ह नृत्य करीत असतांना पॅरीला म्हणते—" तुला आठवतं का पॅरी? तुझ्याबरोबर जिवंत होऊन नृत्य करण्यासाठी मी माझा आत्मा देखील पणाला लावायला तयार झालें होतें! "

" होय! मी सुद्धा त्यासाठी माझा आत्मा पणाला लावला असता! तुझ्या कमरेला विळखा घालतांना होणारा तुझा स्पर्श, आणि माझ्या गालाला जाणवणारा तुझा उष्ण श्वास यासाठी मी तेव्हां किती आसुसलों होतों! "

पॅरी खालीं वाकतो आणि तिचे ओठ आपल्या ओठांत घेतो. मग तीहि प्रेमभरानें त्याचें चुंबन घेतें; आणि म्हणते—

" पॅरी मला तुझ्या बाहुपाशांत घट्ट कवटाळून घे! माझ्या देहांतील कण न् कण तुझ्या स्पर्शासाठी आतुर झाला आहे. "

पॅरी तिला दृढ कवटाळीत हंसून म्हणतो— " आतां यापेक्षां दृढ कवटाळलं तर तू गुदमरशील ना! "

ती स्मित करते. नृत्य करतांना दोघांची समाधि लागते. वास्तव जगाला सोडून दोघांची मने दूर दूर कोठेंतरी उल्हासाच्या सृष्टीत विहार करूं लागतात.

एकाएकी ज्या ध्वनिमुद्रिकेच्या स्वर्गीय स्वरवृंदावर तीं दोघें नृत्य करीत आहेत, ती बंद होते—आणि कसल्यातरी चावट भावना चेतविणारी ध्वनिमुद्रिका वाजू लागते. छानछोकीच्या पोषाखांतील माणसापैकीं कोणी-तरी हा वात्रटपणा केला आहे. नृत्य करतां करतां ईव्ह आणि पॅरी दच-कून थांबतात. त्यांची समाधि भंग पावते. छानछोकीच्या पोषाखांतील माणसें मोठमोठ्याने फिदफिदू लागतात.

पॅरी संतापानें ईव्हला दूर सारतो. आणि त्या वात्रट मंडळीपाशीं त्वेषानें येतो आणि त्यांतील एका मिस्किल माणसाला उद्देशून म्हणतो—

" अहो मेहेरबान, ध्वनिमुद्रिका बदलण्यापूर्वी नृत्य करणाऱ्या माणसांची परवानगी घेण्याइतका सभ्यपणा तरी दाखवायचा होता ? "

तो मिस्किल इसम नाटकीपणानें म्हणतो– " म्हणजे तुमच्यासारख्यांना आवडेल म्हणून मुद्दाम मी हें गीत लावलें तुम्हांला आवडलें नाहीं वाटतें ? "

" तुमचं थोबाड फोडलेलं आवडेल कां तुम्हांला ? "

पण तो मिस्कील इसम पॅरीकडे लक्ष न देतां आपल्या समोरच्या तरुणीला उपरोधानें म्हणतो– " आपण नृत्य करूं या का ? "

पॅरी क्रोधानें त्या इसमाच्या कोटाची कॉलर धरून हिसकत म्हणतो–

" पाजी इसमा, मी तुझ्याशी बोलतों आहें ! "

" पण मी कुठं तुझ्याशीं बोलतों आहें ? " कुत्सितपणें तो इसम उत्तरतो.

पॅरी कांहीं अतिप्रसंग करणार तेवढ्यांत ईव्ह तेथें धांवते आणि मध्यें पडत म्हणते–

" पॅरी, पॅरी शांत हो...."

तेवढ्यांत ती बाचाबाची ऐकून एक पोलीस त्या ठिकाणीं येतो. आणि पॅरीच्या खांद्यावर हात ठेवीत म्हणतो–" काय रे, तू कुठं आहेस असं तुला वाटलं ? या सद्‌गृहस्थांना तूं काय म्हणून त्रास देतो आहेस? "

पॅरी आपल्या खांद्यावरील त्या पोलिसाचा हात त्वेषानें दूर झटकीत म्हणतो–

" माझ्या अंगाला हात लावशील तर खबरदार! "

" कां? फार मस्ती आली आहे? तुरुंगाची हवा खायची इच्छा आहे का थोडीशी? "

तेवढ्यात ईव्ह पॅरीला आवरीत किंचित् अधिकारवाणीनें त्या पोलिसास म्हणते–

" आपण होऊन कसलाहि अत्याचार करायचा नाही–हा बादशहानें पोलीसखात्याला दिलेला खास हुकूम तुझ्यापर्यंत पोंचला नाही वाटतं? "

असें म्हणत ती आपल्या पर्समधून आपले भेटपत्र बाहेर काढते आणि त्या पोलिसाला देत रागानें म्हणते–

"चार्लीयर हें नांव कधीं ऐकलं आहेस का तू? आँद्रे चार्लीयर पोलीस खात्याचे सरचिटणीस!–मी त्यांची बायको–समजलं ?"

पॅरी भयचकित होऊन ईव्हकडं पाहूं लागतो.

पोलिसाची घाबरून बोबडी वळते. आर्जवी स्वरांत तो तिची क्षमा मागू लागतो. आणि अखेर सलाम करून मागल्या पावली पळ काढतो. त्याच वेळी पॅरी तडकाफडकीं ईव्हला सोडून उपाहारगृहांतून बाहेर चालता होतो.

तें ईव्हच्या लक्षात येताच ती एकदम ओरडून हांक मारते–"पॅरी.."

पण पॅरी मागें न वळता उपाहारगृहांतून बाहेर पडतो. मग ईव्ह संतापानें त्या छानछोकीच्या पोषाखांतील मंडळीकडे वळून म्हणते–

"मूर्खांनो! काय केलंत हें? आतां तरी तुमचें समाधान झालें ना? मी तुम्हाला एक आनंदाची बातमी सांगते, ती ऐका. कंड्या पिकवायला ती तुम्हांला फार उपयोगी पडेल. मी माझ्या नवऱ्याला सोडून दिलें आहे, आणि माझ्या प्रियकराबरोबर मी पळून चाललें आहे. माझा प्रियकर कोण आहे, ते ठाऊक आहे तुम्हांला? एक साधासुधा कामगार!"

आजूबाजूची माणसें तिच्याकडे आ वासून पाहूं लागतात. ती तडकाफडकी उपाहारगृहाच्या बाहेर चालती होते. पॅरी हिरवळीवरून छोट्या पायरस्त्यानें झपझप चालला आहे. ईव्ह त्याला हांक मारीत पळत पळत त्याच्या पाठीमागून येते. पॅरी मागें वळूनहि पाहत नाहीं. अखेर ती त्याला गांठते आणि विचारते–"पॅरी, तुला झालंय तरी काय?"

"पोलीस खात्याचे प्रमुख!" पॅरी कठोरपणें उद्गारतो.

"तो कांहीं माझा अपराध नाहीं." ईव्ह विनवणीच्या स्वरांत त्याची समजूत घालते.

"आणि माझाहि नव्हे!" आणि मग अति कडवटपणानें तो हंसून उद्गारतो–

" आणि या स्त्रीसाठीं म्हणे मी जन्माला आलों होतों ! "

त्याचा सारा कडवटपणा गिळून ईव्ह म्हणते–

" मी त्या साऱ्यांना सांगून टाकलें आहे, की मी तुझ्याबरोबर चाललें आहे. आपण अेकमेकांशीं बद्ध आहोंत " त्या शब्दाबरोबर तो एकदम् थांबतो. आणि तिच्या नजरेला नजर देत त्वेषानें विचारतो–

" एकमेकांशी बद्ध आहोंत? आतां तुझ्यामाझ्यांत कोणते पाश उरले आहेत ? "

त्याचा हात आपल्या हातांत दाबत ती उत्तरते–" प्रीतीचे पाश ! "

" अशक्य कोटींतली ही प्रीति आहे " पॅरी दुःखित होऊन म्हणतो. क्षणभरानें तो पुन्हां तिला म्हणतो–" आजपर्यंत सारं आयुष्य कोणतं कार्य करीत मीं घालवलं, याची तुला कल्पना आहे ? तुझ्याविरुद्ध बंडाचा उठाव करण्यांत माझं सारं शक्तिसर्वस्व मी वेचलं आहे."

" माझ्या विरुद्ध ? "

" स्वातंत्र्यपूजकांची संघटना तुला ऐकून ठाऊक असेल ? "

" काय–स्वातंत्र्यपूजकांची संघटना–? " ईव्ह भयानं ओरडते.

" होय. ती निर्माण करणाऱ्यांपैकीं मी एक आहें. "

ईव्ह मान वळवून एकदम पुटपुटते–" मला हिंसेचा तिरस्कार आहे."

" आमच्या हिंसेचा ! आणि त्यांनीं केलेले अत्याचार तुला चालतात? "

" मी असल्या गोष्टींकडे कधीच लक्ष दिलेलें नाहीं. "

" त्यामुळेंच तुझे नि माझे मार्ग आतां भिन्न झालेले आहेत. या तुझ्या माणसांनींच मला ठार मारलं होतं आणि मला परत जिवंत होण्याची संधि मिळाली नसती तर त्यांनींच माझ्या सहकाऱ्यांची सरसहा कत्तल केली असती. "

त्याचा हात हातांत घेऊन पुन्हा प्रेमानं दाबीत ईव्ह म्हणते–

" पण पॅरी, तूं पुन्हा जिवंत झालास तें माझ्यामुळें हें तुला विसरतां येणार नाहीं. "

पॅरीच्या आवाजांत स्निग्धता येते आणि तो म्हणतो–" खरं आहे! ईव्ह, तू म्हणतेस तें खरं आहे. पण तुझ्या आजूबाजूच्या साऱ्या गोष्टींचा आणि साऱ्या माणसांचा मला तिरस्कार वाटतो. "

" पण त्या कांहीं मी निवडल्या नाहींत. पॅरी अेकमेकांवर अविश्वास दाखविण्या इतका देखील आपणाला अवधि नाही. "

तेवढ्यांत झाडावरचें अेक पान सळसळत खाली येतें, आणि त्या दोघांच्या मध्यें पडतें. दोघेहि दचकतात. पॅरी हंसून तिला विचारतो– " झाडाच्या पानाला घाबरलीस ? "

" छे, छे ! मला वाटलं ......"

" काय वाटलं ? "

हलक्या आवाजांत ती म्हणते–" मला वाटलं .... ते सारे इथेंच असतील. "

पॅरी तिच्याकडे विस्मयानें पाहतो. आणि मग त्यालाहि तिच्या बोलण्याचा बोध होतो.

" खरं आहे. ते सारे इथेंच असले पाहिजेत ! माझा म्हातारा वाटाड्याहि इथंच असला पाहिजे. आपणां दोघांकडे ते गंमतीनें पहात असले पाहिजेत."

ईव्ह खालीं पडलेलं पान उचलीत म्हणते–

" सगळेच इथं असतील असं नव्हे–पण त्यापैकी निदान एक तरी.. आपल्यावर स्वतःच्या छोट्या मुलीची जबाबदारी सोपविणारा तो कामगार–"

" होय, खरंच...."

" पॅरी, आपण त्याला वचन दिलं होतं ! "

पॅरी बसल्या जागेवरून उठत नाही. मग आपला हात पुढें करीत ईव्ह किंचित् आर्जवीपणानं म्हणते–

" पॅरी, तू असं रे काय करतोस ? तूं मला मदत नाहीं करणार ? निदान एवढं तरी सत्कृत्य आपण करूं या ! "

पॅरी हंसतो. आणि नव्या उमेदीनें उठत तिच्याकडे रोखून पहात म्हणतो–

"आपण कांही इतर माणसांसाठी पुन्हां आलों नव्हतों...."

ईव्ह प्रेमळपणानं म्हणते–

"जें आपल्याला सहज करतां येणं शक्य आहे, तें तर करूं या?"

आणि मग एकमेकांच्या हातांत हात घालून ते चालू लागतात.

## कामगारांच्या वस्तींत–

एका गलिच्छ वस्तीमधील एक आड बाजूचा रस्ता! पॅरी आणि ईव्ह हमरस्ता ओलांडून या आडरस्त्यावर येतात. या रस्त्यावरून येणारे जाणारे दरिद्री लोक आणि भिकारी पोरें त्यांच्याकडे पाहूं लागतात. अस्वस्थतेनें ईव्ह आपला फरचा कोट चांचपीत सभोंवतालचें दैन्य न्याहाळूं लागते. तिला आपल्या वैभवाची लज्जा वाटू लागते. या रस्त्यावर ठिकठिकाणी उकीरडे, तुबलेली गटारें आणि केरकचरा सांचलेला आहे. एक म्हातारी बाई, सार्वजनिक नळावर भरलेले दोन हंडे वाकत वाकत कुठेशीं घेऊन चालली आहे. अंगावर लक्तरें ल्यालेली चारदोन पोरें गटारांत खेळत आहेत.

अखेर पॅरी एका दुकानाशी येऊन आपल्या हातातल्या पत्त्याची खात्री करून घेत उभा राहतो. दुकानासमोर भिकारडया बायांची रांग लागलेली आहे. दुकानाशेजारच्या घराची अवकळा पाहत पॅरी उद्गारतो–"हेंच तें घर!"

दारामध्यें उभ्या राहिलेल्या बायांची रांग दूर करीत पॅरी ईव्हला रस्ता करून देतो. ईव्ह जात असतांनाच त्या बाया वळून वळून डोळे विस्फारून पाहात राहतात. ईव्हच्या पाठोपाठ पॅरीहि त्या घरांत शिरतो. एक धुरकटलेला आणि मोडकळीस आलेला जिना ती दोघें चढू लागतात. ईव्ह हें सारें अप्रिय वातावरण मोठ्या निश्चयानें पचनीं पाडीत चालली आहे. तिच्या मुद्रेवरील बारीक सारीक फरकाकडे पॅरीचें लक्ष आहे.

पहिल्या मजल्याचा जिना ओलांडून दुसऱ्या जिन्याकडे जात असतांना, वाटेंत एक म्हातारा कामगार खोकत खोकत वर चाललेला ईव्हला दिसतो. त्याचे हाल पाहून ईव्हला करुणा येते, आणि ती किंचित् थबकते. पॅरी मागें वळतो आणि तिचा हात आपल्या हातांत घेऊन वर जाऊं लागतो, ती त्याच्याकडे पाहून आत्मविश्वासानें स्मित करते.

तिसऱ्या मजल्याच्या टोकाशीं येतांच कोठल्यातरी एका दारांतून रेडिओच्या भसाड्या आवाजांतलें गाणें त्यांना ऐकूं येतें. या मजल्याच्या जिन्याच्या टोकाशी एक छोटी मुलगी रडत बसली आहे. तिच्या अंगावर लक्तरें आहेत, आणि तिच्या डोळ्यांत अश्रू उभे आहेत.

पॅरी तिच्याकडे पाहत म्हणतो– "हीच ती मुलगी असली पाहिजे."

त्या गोजिरवाण्या मुलीला पाहतांच ईव्हच्या हृदयाची कालवाकालव होते. किंचित् वांकून त्या मुलीच्या केसांवरून हात फिरवीत ईव्ह विचारते– "बाळ, तुझं नांव काय ?"

"मेरी"

"मेरी कोण ?"

"मेरी अॅस्ट्रूक"

तें नांव ऐकतांच ईव्ह आणि पॅरी एकमेकांकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पाहतात. मग पॅरी तिला विचारतो– "बाळ, तुझी आई कुठं आहे !"

ती मुलगी भित्र्या दृष्टीनें मागें वळून एका दाराकडे पाहते. पॅरी चटकन् उठून तिच्या मागेंच असलेल्या बंद दरवाजापाशीं जातो. आणि दार ठोठावूं लागतो. तेवढ्यांत ती छोकरी घाईघाईनें पॅरीजवळ येऊन त्याला म्हणते–

"तुम्ही आंत जाऊं नका. जॉर्ज काका घरीं आले आहेत. म्हणून तर मी बाहेर बसलें आहे."

पॅरी क्षणभर विचार करतो आणि मग कांहीं एक निश्चय करून तो दार जोरजोरानें ठोठावतो. बराच वेळ आंतून कांहीं उत्तरच येत नाहीं.

रेडिओंतल्या भसाड्या आवाजांतलें गाणें चाललेंच आहे. अखेर पॅरी जोर-जोरानें धडक्या देऊं लागतो. तेव्हां आंतून कोणी तरी विचारतें– " कोण आहे ? "

" कोण माणसं आहांत कीं कोण आहांत ? दार उघडतां येत नाहीं तुम्हांला–? .... "

" आलों, आलों. उगीच शंख करूं नका ! "

रेडिओचा आवाज एकदम थांबतो. करकरत्या पलंगावरून कोणी-तरी उठल्याचा आवाज ऐकू येतो. आणि दार उघडलें जातें. एक गलेलठ्ठ क्रूर दिसणारा माणूस सूटपॅंटवरील कमरेचा पट्टा बांधीत दारांत येऊन उभा राहतो. पॅरीकडे पाहून कपाळाला आंठ्या घालत तो म्हणतो–

" काय चावटपणा आहे ? लोकांच्या घराची दारं मोडायचा विचार आहे काय ! "

पॅरी न बोलतां खोलींत प्रवेश करतो. ईव्ह त्याच्या पाठोपाठ त्या मुलीला घेऊन आंत येते. तो इसम आ वासून त्यांच्याकडे पाहूं लागतो. त्या मृत कामगाराची बायको खोलीमध्यें एका मोडक्या पलंगावर बसली आहे. अंगावरचे कपडे सावरतांना तिची तारांबळ उडाली असावी. पॅरी ह्या बाईला न्याहाळीत विचारतो–

" तुम्हीच मॅडम अॅस्ट्रुक का ? "

" होय. मीच ती. "

" आणि ही मुलगी तुमचीच ना ? " ईव्ह विचारते.

तो क्रूर माणूस दार ढकलून मागें वळत विचारतो–

" कां, फारशी खोदखोदून चौकशी चालवली आहे ? "

" कामाशिवाय कोण कशाला कुणाची चौकशी करील ? "–पॅरी म्हणतो. आणि पुन्हां त्या बाईकडे वळून तो विचारतो–" मी तुम्हांला विचारतो आहे, ही तुमचीच मुलगी ना ? "

" होय ! मग त्याचें काय ? "

" ही मुलगी बाहेर बसून रडत कां होती ! "

" हें पहा बाई, तुम्हांला तुमचा फरचा कोट कसा मिळाला हें कांहीं मी विचारत नाहीं. तुम्हांला अेवढं कळायला पाहिजे की एखाद्या घरांत जर अेकच खोली असेल तर कांहीं वेळां घरांतल्या पोरांना बाहेर पिटाळावें लागतें. "

" ठीक आहे. " ईव्ह म्हणते–" ही छोकरी तुमच्या आड येत असेल, तर आम्ही तिला घेऊन जायला तयार आहोंत. आम्ही तिच्या वडिलांचे स्नेही आहोंत. "

" काय म्हणालांत ? " कठोर स्वरांत ती बाई विचारते.

" होय. या मुलीला मी घेऊन जाणार आहे. " ईव्ह म्हणते.

त्याबरोबर तो क्रूर माणूस एकदम खेकसतो–

" या घरांतून तुम्ही ताबडतोब चालते व्हा पाहूं ! "

पॅरी ओरडून म्हणतो– " जरा सभ्यपणानं बोलाल का ? आम्ही इथून ताबडतोब जाणारच आहोंत. पण या मुलीला घेतल्याशिवाय नाहीं! "

" तुमच्याजवळ तशा अधिकाराचे कागदपत्र आहेत का ? "

ईव्ह आपल्या पर्समधून नोटांचें एक छोटें पुडके काढून तिच्यासमोर टाकत म्हणते– " मला वाटतं हे एवढे तुम्हांला पुरतील ! "

डोळे विस्फारून तो क्रूर माणूस आणि ती बाई पाहूं लागतात. मग भानावर येत तो क्रूर माणूस त्या पोरीकडे पाहून ओरडतो– " ए पोरी, इकडे ये पाहू.... "

त्याबरोबर ती मुलगी घाबऱ्या घाबऱ्या पॅरीच्या मागें येऊन दडते. पॅरी चटकन् तिला उचलून घेतो.

टेबलावरील त्या पैशाच्या नोटा उचलीत ती बाई म्हणते–

" कांही तरी भानगड दिसते आहे. जॉर्ज आपण पोलिसांना बोलावूं या का ? "

" जरूर ! " पॅरी म्हणतो– " जा लवकर बोलावून आण. बरेच दिवस ते ह्या सद्गृहस्थांच्याच शोधांत आहेत. " असें म्हणत पॅरी ईव्हला खुणावतो आणि त्या मुलीला उचलून घेऊन ते दोघे बाहेर पडतात.

## उपनगरांतील एका बंगल्यांत

अेका बंगल्यापुढील बागेच्या फाटकांतून ईव्ह आणि पॅरी हंसतमुखानें बाहेर पडत आहेत. दोघेहि हात हलवून कुणाला तरी निरोप देत आहेत. बंगल्याच्या पोर्चमध्यें कुणा अेका ममताळू स्त्रीचा हात धरून मेरी हात हलवीत निरोप देत उभी आहे. तिच्याभोंवती उबदार टॉवेल गुंडाळला आहे. त्यावरून तिला नुकतेंच न्हायला घातलें असावें असें दिसतें. तिच्या ओलसर केसावर रंगीत रिबीनची गांठ दिसत आहे. मोठ्या आनंदानें आपले दोन्ही हात उंचावून ती ईव्ह अणि पॅरी यांना निरोप देऊं लागते. आनंदाच्या भरांत तिच्या अंगाला गुंडाळलेला टॉवेल सपशेल खालीं पडतो. तिच्या शेजारी उभी असलेली बाई हंसू लागते आणि खालीं वांकून तो खाली पडलेला टॉवेल तिच्या अंगाभोंवतीं लपेटू लागते. ईव्ह आणि पॅरी अेकमेकांकडे पाहून हंसतात. फाटकांतून बाहेर पडल्यानंतर ईव्ह पॅरीला म्हणते–

"निदान या बाबतीत तरी आपण यशस्वी झालों." क्षणभर ती विचारमग्न होते आणि पुढें म्हणते–"पॅरी. सर्व कांहीं सुरळीत पार पडलं तर आपण तिला आपल्या घरीं ठेवूं या हं!"

"कांहीं काळजी करूं नकोस. सर्व कांहीं सुरळीत पार पडणार आहे." पॅरी आत्मविश्वासानं म्हणतो. तो तिचा हात आपल्या हातांत घेतो. आणि पलीकडे उभ्या असलेल्या टॅक्सीच्या रोखानं जाऊं लागतो. शोफर गाडी सुरू करतो. आंत बसण्यापूर्वी ईव्ह पॅरीला थांबवते आणि आजूबाजूला शून्यामध्यें कोठेंतरी पाहत म्हणते–

"तूं इथंच आसपास कोठेंतरी आमच्यावर लक्ष ठेवून उभा असलास, तर तुला समधान झालं असलं पाहिजे. तुझी छोटी मुलगी आतां चांगल्या माणसांच्या हातांत अगदीं सुरक्षित आहे."

शोफर डोळे विस्फारून बाईच्या या विचित्र प्रकाराकडे पाहूं लागतो. तेवढ्यांत ती दोघे आंत बसतात. गाडी भरधांव वेगानें धावू लागते.

## पॅरीच्या घरीं–

पॅरीच्या घरासमोर गाडी उभी राहते. पॅरी आणि ईव्ह गाडींतून खालीं उतरतात. पॅरी शोफरला भाड्याचे पैसे चुकते करीत आहे. तोंवर ईव्ह आजूबाजूची वस्ती न्याहाळू लागते. पॅरी बोट दाखवून म्हणतो–

" ह्या इमारतींत तिसऱ्या मजल्यावर डावीकडून तिसरी खिडकी दिसते आहे ना, तें माझें घर."

ती पॅरीकडे वळून बघू लागते. पॅरी तिच्यासमोर किल्ली धरून म्हणतो–

" ही माझ्या घराची किल्ली !"

" म्हणजे ? तूं येणार नाहीस ?" ईव्ह चकित होऊन विचारते.

पॅरी क्षणभर गोंधळतो आणि खुलासा करतो–

" ईव्ह, मला माझ्या मित्रांना भेटलंच पाहिजे. मी जेव्हां....त्या तिकडे होतो, त्या वेळी मला बऱ्याच गोष्टी कळल्या आहेत. आमची फसगत झाली आहे......मला साऱ्यांना वेळीच सावध करायला हवं."

" अगदी आतांच जायला हवं का ?"

" उद्यां म्हणजे फार उशीर होईल !"

" जशी तुझी मर्जी !" खट्टू होऊन ईव्ह उद्‌गारते.

"पण ईव्ह मला जायलाच हवं !" पॅरी आर्जवी स्वरांत म्हणतो. क्षणभरानं तिच्या मुखावरील भाव न्याहाळीत तो खुलासा करतो–"शिवाय सध्यां तू एकटीच वर जावसं अशी माझी इच्छा आहे."

" तें कां ?"

" तुला माहीतच आहे कीं माझं घर कांहीं तुझ्या घरासारखं बादशाही थाटाचं नाहीं !"

ईव्ह मन:पूर्वक हंसते आणि कृत्रिम कोपानं पॅरीकडे पाहात ती म्हणते–

" चल वात्रट ! कोणतं, तिसरं दार म्हणालास का ?"

पॅरी मानेनें होय म्हणतो. त्याच्या मुद्रेवर समाधान झळकतें.

" वर गेलीस म्हणजे खिडकींतून तू मला खूण कर. म्हणजे तुला माझी खोली सांपडली असं मी समजेन !"

ईव्ह हंसते आणि मानेनें होय म्हणून त्या इमारतींत शिरते. पॅरीच्या खोलींत येतांच ती दार ढकलून घेते आणि आजूबाजूला न्याहाळते. ही खोली कांही विशेष भपकेबाज नाहीं. पण स्वच्छ आणि नीटनेटकी ठेवली आहे. एका पडद्याच्या मागें ड्रेसिंग रूम आणि पलीकडे एक चिमुकलें स्वयंपाक घर ! एवढ्या घरांत आपल्याला संसार थाटावा लागणार या कल्पनेने क्षणभर ईव्हला धक्का बसतो. पण चटकन् ती आपल्या मनाला आवर घालते. आणि मग खिडकीपाशीं जाऊन ती दार उघडते. दार उघडून पॅरीला खुणावत आनंदानें ओरडून म्हणते–" फारच छान आहे, पॅरी."

रस्त्यावर अस्वस्थतेनें येरझारा घालीत असलेला पॅरी वर पाहतो. त्याच्या मुखावर स्मित झळकतें.

" तुला खरंच आवडली माझी खोली ?"

" अगदी खरं !"

मग तो ओरडून तिला म्हणतो–" थोड्याच वेळात मी परत येतों हं !" असं म्हणून तो घाईनें चालता होतो. पॅरी दृष्टिआड होईपर्यंत ईव्ह त्याला पाहत राहते. आणि मग ती मागें वळते. तिची मुद्रा पुन्हां खिन्न होते. आपल्या हातांतली बॅग ती एका टेबलावर ठेवते. चटकन् तिचें लक्ष टेबलावर कलत्या ठेवलेल्या एका फ्रेममधील फोटोकडे जातें. एका वयोवृद्ध आणि प्रसन्न मुद्रेच्या स्त्रीचा तो फोटो आहे. हीच पॅरीची आई. या फोटोशेजारीं असलेल्या फुलदाणीत निर्माल्य झालेली फुलें पडलेलीं आहेत. ईव्ह चटकन् तीं फुलें उचलून बाहेर काढते. तिच्यांतली गृहिणी जागी होते. अंगांतला फरफोट काढून ठेवून ती घाईघाईनें कामाला लागते.

## क्रांतिकारकांच्या तळावर–

पॅरी क्रांतिकारकाच्या बैठकीच्या नियोजित जागीं येऊन पोहोंचतो. आजूबाजूला कानोसा घेत तो एका इमारतीत शिरतो. जिना चढून तो घाईघाईनें वर येतो. आणि दारावर परवलीच्या खुणेनें टकटक करतो. आंत सारे वातावरण स्तब्ध आहे. दारावर पुन्हां थाप मारीत तो हलकेंच म्हणतो– " मी ड्यूमेन ! "

दार उघडतें. त्याच्यासमोर उभा असलेला कामगार त्याला आत वाट करून देतो. हा कामगार म्हणजे दुसरा तिसरा कोणी नसून ज्यानें सकाळीं पॅवलोला पॅरीचा पाठलाग करण्यास सुचविलें होतें, तोच होय. पॅरी घाईने आंत येतो. आणि आपल्या सहकाऱ्यांच्यावर दृष्टि टाकतो. टेबलाच्याभोंवतीं डिक्सन, लॅगलॉय, आणि रेनॉडेल बसले आहेत, त्यांच्या मागे पॅवलो उभा आहे. दार बद करून तो कामगार मागें फिरतो. सारी माणसे पॅरीकडे विचित्र संशयी नजरेने पाहूं लागतात. पण पॅरी चितेने चूर होऊन प्रक्षोभानें म्हणतो–

" कांही तरी भानगड झाली आहे ! उद्यां आपण यत्किंचितहि हाल-चाल करतां कामां नये. उद्यांचा उठाव आपण रद्द केला पाहिजे. "

सर्वांच्या मुद्रा निर्विकार आहेत. फक्त डिक्सन कावेबाजपणे उद्गारतो– " असं ? "

पॉलीन खाली वाकून ग्लास उचलत मद्याचा एक घोट घेतो. पॅवलो शांतपणे खिडकीजवळ जाऊन उभा राहतो. सर्वांच्या वर्तनांतला विचित्रपणा पॅरीच्या लक्षात येतो.

" तुम्ही मोठे खुषीत आहांत असें दिसतें ? " असं उद्गारून तो स्वतःच हंसू लागतो पण साऱ्यांच्या दगडी मुद्रा पाहून त्याचें हास्य विरघळतें. मग तो गभीरपणें म्हणतो–

" आपल्या कटाचा गौप्यस्फोट झाला आहे. सरकारला प्रत्येक गोष्टीची बित्तंबातमी लागली आहे. बादशहानें आणीबाणीच्या वेळी उपयोगी पडावें म्हणून प्रचंड सैन्य आणून ठेवलं आहे. "

डिक्सन थंडपणें म्हणतो– "मोठी मजेदार बातमी दिसते! पण ही बित्तंबातमी आपल्याला कशी लागली, तें आम्हांला समजेल काय?"

पॅरी खुर्चीवर बसत अडखळत म्हणतो– "तें मी तुम्हांला सांगू शकणार नाही."

लँगलॉय क्रोधानें म्हणतो– "निदान चार्लीयरनें तर तुला ही बातमी दिलेली नाहीं ना?"

पॅरी दचकतो– "कोण म्हणालात?"

"ज्यांच्या घरी तुम्ही आज सकाळी गेला होता, ज्यांच्या बायको-बरोबर तुम्ही आज दुपारीं हिंडत होता...."

"तें विसरून जा! ह्या आपल्या गोष्टीशीं तिचा कांही संबंध नाहीं." पॅरी म्हणतो.

पण रेनॉडेल कठोरपणें पुन्हां म्हणतो– "पोलीसप्रमुखांच्या बायको-बरोबर तुमचें कसलें एवढें हितगुज चाललें होते, तें विचारण्याचा अधिकार आम्हांला आहे, असं आम्हांला वाटतं."

पॅरी ताडकन् उठून उभा राहतो आणि प्रत्येकाच्या मुद्रेवर रोखून पाहत अखेर म्हणतो–" ईव्ह माझी बायको आहे."

उपहासाने हंसून डिक्सन उभा राहतो. बाकीचे सारे विचित्र मुद्रेनें पॅरीकडे रोखून पाहू लागतात. डिक्सनचें हास्य पॅरीला झोंबते. आणि तो भडकून ओरडतो–

"ही थट्टा करण्याची वेळ समजलांत काय? मी तुम्हाला सांगतो आहे कीं या आपल्या कटाचा गौप्य स्फोट झाला आहे; उद्यां आपण यत्-किंचित्हि हालचाल केली तर साऱ्यांची कत्तल होईल; आणि संघटना धुळीला मिळेल; आणि तुम्ही चार्लीयरच्या बायकोबद्दल बोलतां आहांत?"

डिक्सन शांतपणें पॅरीच्या समोर येऊन उभा राहतो. आणि पॅरीच्या नजरेला नजर देत तो म्हणतो–" मी काय म्हणतो तें ऐक, पॅरी. आज सकाळीं तू जळजळीत शब्दांत म्हणत होतास कीं उद्यांच्या आपल्या बेता-पासून रेसभरहि माघार घेतां येणार नाहीं. नंतर तू बाहेर पडलास.

कोणीतरी अज्ञात इसमानें तुझ्यावर गोळी झाडली. कोणास ठाऊक ती खरी गोळी होती कीं वायबार होता.? त्यांतून सावरून तू उठलास. पॅवलो तुझ्या-बरोबर येणार होता तर त्याला तूं टाळलंस आणि थेट चार्लीयरसाहेबांच्या घराची वाट धरलीस. आणि आतां इथं येऊन तू आमच्यासमोर येऊन लंब्या चवडया गप्पा मारतोस! कोण तुझ्यावर विश्वास ठेवील?''

'' अस आहे तर?'' पॅरी ओरडतो– '' पांच वर्षे मी तुमच्याबरोबर खांद्याला खादा लावून अहोरात्र राबलों आहे. ही संघटना निर्माण करणाऱ्यांमध्यें मीहि एक होतों......''

रेनॉडेल चटकन् उठत त्याला अडवीत म्हणतो– '' पुरें झालें! हें पहा तुझं आत्मचरित्र ऐकायची कांही आमची इच्छा नाही. चार्लीयरच्या घरीं तू काय करीत होतास, तें आम्हांला पाहिजे!''

पॉलीन उठतो आणि म्हणतो– '' आणि उपाहारगृहांत आपलें कसलें खलबत चाललें होतें तें आम्हांला जाणून घ्यायचं आहे.''

लॅंगलॉय कडक शब्दांत म्हणतो– '' कामगार वस्तीत जाऊन एका बाईची लहान पोरगी तू पळवून नेलीस. आणि त्याला पोलिसाच्या ताब्यांत देण्याची तू धमकी दिलीस. आणि त्यानें गडबड करूं नये म्हणून त्यांच्या अंगावर नोटांचें पुडकें फेकलेंस!''

पॅरी एकामागोमाग एक असा प्रत्येकाच्या मुद्रेवर रोखून पाहतो. प्रश्नांची सरबत्ती ऐकून तो किंचित् गांगरतो. या सर्वांचें समाधान करणें आपल्या आटोक्याच्या बाहेर आहे याची त्याला जाणीव होते. आणि अखेर तो अगतिकपणें म्हणतो–

'' माफ करा. यापैकीं कशाचाच खुलासा मी करूं शकणार नाहीं. मला तुम्हांला इतकंच सांगायचं आहे कीं उद्यांचा उठाव रद्द केला पाहिजे.''

'' आम्ही विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें तुला द्यायचीं नाहींत का?'' डिक्सन विचारतो.

'' मी तुम्हांला एकदां सांगितलेलं आहे, मी तुम्हांला उत्तर देऊं शकणार नाहीं. आणि आतां मलाच तुम्हांला एक प्रश्न विचारायचा आहे. तुमचा नायक आणि पुढारी म्हणून तुम्हीं मला मानणार आहांत कीं नाहीं?''

डिक्सन शांतपणें उत्तर देतो– “ पॅरी, यापुढं तू आमचा कोणीही नव्हेस. ”

पॅरी उपहासानें हंसून म्हणतो– “ तुला मोठा आनंद झाला असेल नाहीं, डिक्सन ? माझ्या जागेसाठी तू टपून बसला होतास. . . . ” आणि एकदम भडकून तो ओरडतो–

“ पण मूर्खांनों, तुम्हांला वाटलं तरी काय ? पैशासाठीं माझी संघटना मी विकून टाकीन ? तुम्हीं मला चांगलं ओळखतां. . . .आणि तू पॅवलो, तूं देखील. . . . ? ”

पॅरी आपल्या बोलण्याचा परिणाम अजमावून पाहूं लागतो. सर्वांच्या मुद्रा निर्विकार आहेत. पॅवलो शांतपणें येरझारा घालण्यांत मग्न आहे.

“ अस्सं ! तर मग तुम्ही हा एकमतानें निर्णय घेतला आहे ? ठीक आहे ! तुम्हांला काय ठरवायचं असेल तें खुशाल ठरवा. पण मी तुम्हांला पुन्हा एकदां बजावून ठेवतों आहे– उद्यां तुम्ही उठाव केलात तर तुम्हां सर्वांची कत्तल होईल. आणि या विनाशाला तुम्ही सारे जबाबदार रहाल! ”

डिक्सन शांतपणें त्याला थांबवीत म्हणतो– “ पॅरी, आतांपर्यंत आम्ही पुष्कळ ऐकलं. आता कृपा करून बाहेरचा रस्ता सुधार. ”

आणि एकामागोमाग असे सारे पॅरीकडे पाठ वळवून बसतात. रेनॉडेल उपरोधाने म्हणतो– “ आणि यदाकदाचित् जर कांही घोटाळा झालाच, तर आपली सल्लामसलत घेण्यासाठी आम्ही जरूर आपल्या घरीं येऊं. ”

सारे आपल्या जागेवरून उठतात, आणि खिडकीजवळ जाऊन पॅरीकडे पाठ करून उभे राहतात. पॅरी एकटाच हताशपणे, अगतिक मुद्रेनें पाहात उभा आहे. असहायपणें तो अखेर उद्गारतो––

“ ठीक आहे. जशी तुमची मर्जी ! तुम्हांला गंमत वाटत असेल तर खुशाल आपल्या हातानें आपल्यावर विनाश ओढवून घ्या. मूर्खांच्यासाठीं माझ्या हृदयाला कधीहि पाझर फुटणार नाहीं. ” असें म्हणून तो दारापाशीं जातो आणि फिरून मागें वळून आपल्या सहकाऱ्यांना उद्देशून म्हणतो– “ मित्रहो, मी काय म्हणतों आहे, तें ऐका ...... ”

सर्वजण पाठी फिरवून खिडकीतून बाहेर पाहत उभे राहिले आहेत. पॅरीच्या शब्दांनी त्यांच्या वृत्तीत तिळमात्रहि चलबिचल होत नाहीं.

अखेर क्रोधानें दार आदळून पॅरी चालता होतो.

## पॅरीच्या घरीं–

फुलदाणीत गुलाबाची फुलें रचण्यामध्यें ईव्ह मग्न आहे इतक्यांत दारावर थाप ऐकू येते. हातांतलें काम पुरें करून दरवाजापाशी जाऊन ती दार उघडते. दारात पॅरी उभा राहतो. त्याची मुद्रा अत्यंत म्लान झाली आहे. त्याच्याकडे पाहून ती प्रसन्नपणें स्मित करते. तिच्याकडे पाहून तो हंसण्याचा प्रयत्न करतो. नंतर आपल्या खोलीत तो आजूबाजूला नजर टाकतो.

कुठल्यातरी नव्याच घरांत आपण प्रवेश केला आहे असें त्याला वाटू लागतें. ईव्हने काही विशेष केलें आहे असें नाही. फक्त तिनें ठिकठिकाणीं फुलांची सजावट केली आहे; खिडकीवर मोहक पडदे लावले आहेत; मेजावरील दिव्याची कांच बदलली आहे; मेजावर नवें टेबलक्लॉथ घातलें आहे आणि पूर्ण अंधार पडण्यापूर्वीच दिवा लावून ठेवला आहे. पॅरीच्या मुद्रेवरील भाव न्याहाळत ईव्ह त्याच्या मागोमाग येते. तो टेबलाजवळ जातो आणि अस्वस्थपणे फुलदाणीतील एका फुलाची पाकळी नखानें कुरतडतो. मग खिडकीपाशी जाऊन पडदा चांचपून पाहतो. त्याच्या मुद्रेवर खिन्नतेचे ढग जमा होतात. तो तिला म्हणतो–

" ईव्ह, तुझ्या पैशानं मला असली छानछोकी केलेली आवडणार नाही. "

ईव्ह नाराज होते. आणि किंचित् कठोरपणें म्हणते–

" पॅरी, हें जसं तुझं घर आहे तसंच माझंहि नव्हे का ? "

पॅरी बोलत नाही. खिडकीतून तो उदासपणें बाहेर पाहूं लागतो. ईव्ह त्याच्याजवळ येऊन प्रेमानं विचारते– " तूं आपल्या मित्रांना भेटलास का? "

तिच्याकडे न पाहतां तो खिन्नपणे उत्तरतो– " आतां मला कोणीहि मित्र उरले नाहीत. ईव्ह त्यानी मला हाकलून दिलें आहे. "

" कां ? "

" उद्यां बादशहाविरुद्ध बंडाचा उठाव करण्याचा आमचा बेत ठरला होता. मी त्यांना सांगायला गेलों की सरकारला या बेताची बातमी लागली आहे. आणि त्यांनींच आपल्याभोंवती डाव टाकला आहे. म्हणून उद्यांचा बेत रद्द केला पाहिजे. तर त्यांनी मला विश्वासघातकी ठरविलें. "

ईव्ह स्वब्धपणें ऐकू लागते. पॅरी रुक्षपणें हसत पुढें म्हणतो–" त्यांनीं मला तुझ्याबरोबर पाहिलें. तुझ्या नवऱ्याला ते चागले ओळखतात. "

एकाएकीं पॅरी दचकतो. आजूबाजूला विचित्रपणें कानोसा घेऊं लागतो. धोक्याची जाणीव व्हावी तशी त्याची मुद्रा गंभीर होते. चटकन् तो दिवा मालवतो. आणि टेबलाच्या ड्रॉवरमधून एक पिस्तुल काढून आपल्या कोटाच्या खिशांत दडवतो. आणि मग दारापाशीं जाऊन ईव्हला खुणावत म्हणतो–" दारासमोर उभी राहूं नकोस. " ईव्ह चटकन् बाजूला होते.

मग पॅरी खाडकन् दार उघडतो. दारांत पॅवलो उभा आहे. पॅरी त्याला ओळखतो आणि म्हणतो–

" अस्सं ! आपली स्वारी आहे तर ! काय पाहिजे तुला ? "

पॅवलो एकदम उत्तर देत नाहीं. त्याला धाप लागली आहे. आणि त्याची जीभ अडखळते आहे.

पॅरी तोच प्रश्न पुन्हां दरडावून करतो. त्याबरोबर पॅवलो गडबडीनें म्हणतो– " तुला इथून ताबडतोब निघून गेलं पाहिजे. आपल्या सहकाऱ्यांची माथीं फिरलीं आहेत. ते सारे इकडेच निघाले आहेत. कदाचित् ते तुला गोळी घालून ठार करतील ! "

" मीं हा गौप्यस्फोट केला असं तुला वाटतं का ? "

" तें मला माहीत नाहीं. " पॅवलो उत्तरतो– " पण तुला तेथून ताबडतोब निघून गेलं पाहिजे. "

पॅरी क्षणभर विचारमग्न होतो. आणि मग म्हणतो–" ठीक आहे. मी तुझा अत्यंत आभारी आहे. "

पॅवलो निघून जातो. पॅरी पुन्हां दार बंद करून घेतो. ईव्ह भिंतीशीं रेलून उभी आहे. तिच्याजवळ जात पॅरी म्हणतो–" ईव्ह तुला इथून निघून

गेलं पाहिजे. तो काय म्हणाला तें तूं ऐकलंस ना ? आतां तूं इथं राहणं बरं नव्हे. "

ईव्ह ंसून विचारते—" आणि तू ? तूं माझ्याबरोबर येणार आहेस का ? "

" नाहीं ! " आपल्या खिशामधील रिव्हॉल्व्हर परत ड्रॉवरमध्यें टाकत पॅरी उत्तरतो.

" मग मीहि इथंच राहाणार. "

" छे, छे, असं तूं करतां कामा नये. "

" मग मी जाऊं तरी कुठं ? "

" ल्यूसेटाकडे. " पॅरी सुचवितो.

ती शांतपणें म्हणते—" पॅरी, मी मृत्यूला भीत नाही. मरण म्हणजे काय आहे, तें मला पूर्णपणें कळून चुकलं आहे. " असं बोलत फुलदाणींतील एक टवटवीत गुलाबपुष्प उचलते आणि केसांत घालते. आणि म्हणते— " आणि शिवाय काही झालं तरी आपण मरणारच आहोंत. होय कीं नाही ? "

पॅरी विस्मयानं विचारतो—" कां म्हणून ? "

" कारण आपण पराजित झालों आहोंत ...." आणि मग पॅरी-जवळ जाऊन त्याचा हात हातांत घेत म्हणते— " आतां तरी मान्य कर. तुला परत जिवंत व्हायचं होतं तें काही माझ्यासाठीं नव्हे ! तुला तुझ्या बंडाचं कार्य पार पाडायच होतं ! आणि सध्यांतरी तें हुकलं आहे, तेव्हां मृत्यु आला तरी तुला मुळींच मनावर घ्यायचं कारण नाही ! ते इथं येऊन तुला ठार मारणार हें तुला माहीत आहे. आणि तरी देखील तू इथंच थांबायचं ठरविलं आहेस, याचा दुसरा कुठला अर्थ होऊं शकतो ? "

" आणि तू, तुझ्या ल्यूसेटाचं रक्षण करण्यासाठी इथं परत आलीस, असं तुला नाहीं वाटत ? "

पॅरीच्या छातीवर ईव्ह आपलं डोकं ठेवते, आणि क्षणभरानें पुटपुटते— " कदाचित, असेलहि ...."

पॅरी तिला आपल्या बाहुपाशांत गोळा करीत म्हणतो–" ईव्ह आपण हरलों आहोंत ! आतां मृत्यूची वाट पाहण्यापलीकडे आपल्या हातांत दुसरें कांहींहि नाहीं ! " मग आपलें डोकें वर करून म्हणतो.

" तें पहा–"

" काय ? "

" आपण दोघं. "

ती वळून पाहते. समोरच्या अेका मोठ्या आरशांत पडलेलें दोघांचें प्रतिबिंब ती प्रथमच पाहते.

" हें पहिलं आणि शेवटचं प्रतिबिंब आहे ! " तो पुटपुटतो.

त्याच्या गळ्यांत हात घालून त्याला मिठी मारीत ती म्हणते–" तूं किती उंच आहेस रे ! " तेवढ्यांत बाहेर फरशीवर पावलांचा आवाज ऐकूं येतो. दोघेहि मान वळवून दाराकडे पाहतात. शांतपणें पॅरी म्हणतो– " ते आलेले दिसतात. " ईव्ह आणि पॅरी अधिकच उत्कटतेनें अेकमेकाला बिलगतात.

" पॅरी मला तुझ्या बाहुपाशांत घट्ट कवटाळूनच घे.... " ईव्ह म्हणते. तिला दृढ आलिंगन देत तो तिच्या मुखावर टक लावतो. तीहि त्याच्या मुखावर आपली अनिमिष नजर स्थिर करते. जणूं दोघेहि आपआपल्या रूपाचा ठसा एकमेकांच्या अंतःकरणांत उमटून ठेवीत आहेत.

" माझं चुंबन घे ना रे ? " ईव्ह कुजबुजते.

तो किंचित् खालीं वाकून तिचं प्रदीर्घ चुंबन घेतो. हळूं हळूं त्याचे हात मिठींतून ढिले होतात. आणि तिच्या शरीराला ठायीं ठायीं स्पर्श करूं लागतात. तिच्या देहांतील कण न् कण फुलून येतो. हलकेंच आपल्या हातानें तो तिच्या रसरशीत उभार वक्षःस्थलांना स्पर्श करतो. मृदु बोटानें तिचीं वक्षःस्थलें कुस्करीत तो म्हणतो– " मी जेव्हां मृतावस्थेंत होतो, त्या वेळीं तुझ्या या मोहक वक्षःस्थलांना स्पर्श करण्याची मला कोण अनिवार लालसा निर्माण झाली होती म्हणून सांगूं ! "

"मी देखील तुझ्या स्पर्शासाठीं तेव्हां आसुसलें होतें....'' ईव्ह पुटपुटते.

दारावर थाप पडते. आणि पाठोपाठ कोणीतरी जोरजोरानें दार ठोठावू लागतें. दारावर बंदुकीच्या दस्त्यांचे दणके बसूं लागतात—

पॅरी ईव्हला घट्ट बिलगतो. तिच्या कानाजवळ आपले ओठ नेऊन तो म्हणतो—

'' आतां क्षणभरांत ते आपल्याला ठार मारतील. पण आपण दोघेहि अखेरच्या क्षणीं एकमेकांच्या बाहुपाशांत आहोंत— ही किती सुखाची गोष्ट आहे ! या एका क्षणांत आपल्या पुनर्जीवनाचें सार्थक झालें !.... ''

ती डोळे मिटून त्याला घट्ट बिलगण्याची पराकाष्ठा करते—

क्षणभर दोघांची परस्परांच्या प्रीतींत समाधि लागते—

आणि इकडे दारावरील धडक्या थांबतात. फरशीवर दूर जाणाऱ्या पावलांचे आवाज ऐकू येतात. जिना उतरून जाणाऱ्या बुटांचा खाड्खाड् आवाज ऐकू येतो. आणि अखेर पावलांचा आवाज हवेंत विरून जातो.

हलकेंच पॅरी आपलें मस्तक उचलतो. ईव्ह वळून दाराकडे दृष्टि टाकते. स्वतःला सोडवून घेत ईव्ह म्हणते—

"ते निघून गेलेले दिसतात.... ! ''

पॅरी खिडकीपाशी जातो आणि खालीं रस्त्यावर वांकून पहात म्हणतो—

"अजून देखील परत येतील ते.''

मग तो मागें वळतो. आणि तिला न्याहाळत तिच्याजवळ जाऊं लागतो. त्याच्या दृष्टीतला अर्थ ओळखून ईव्ह लाजते, आणि मागें सरत उद्गारते— "नको—माझ्याजवळ येऊं नकोस तू ! ''

पॅरी क्षणभर थबकतो—आणि मग पुन्हां तिच्या जवळ जात तो प्रेमभरानें उद्गारतो— "ईव्ह .... ''

ईव्ह स्त्रीसुलभ लज्जेनें दूर सरत असतांनाच तो तिच्या मस्तकाला स्पर्श करून तिचें मुख कुरवाळीत म्हणतो—

" या विश्वांत फक्त तूं आणि मी आहोंत. बाकी साऱ्या गोष्टी झूट आहेत! आपण दोघे एकाकी आहोंत. आपण एकमेकांवर प्रेम केलं पाहिजे. प्रेम करण्यावांचून आपल्याला तरणोपाय नाही. आपलें अस्तित्व समृद्ध करण्याची ही आपली अखेरची संधि आहे......"

ईव्ह् झटकन् स्वतःला सोडवून घेते–आणि पलीकडे मांडलेल्या पलंगावर जाऊन बसते. हाताचा आधार घेऊन उशीवर ती किंचित रेलून अस्वस्थतेनें पॅरीची वाट पाहूं लागते.

पॅरी तिची हालचाल सूक्ष्मपणें न्याहाळतो. मग तोहि अस्वस्थपणें घुटमळत तिच्याजवळ येऊं लागतो.

शय्येजवळ तिच्यासमोर येऊन तो उभा राहतो. मग हलकेंच ईव्ह् पलंगावर उताणी लवंडते. तिचे दोन्ही हात उशीच्यावर दोन्ही बाजूला सैलसे पडले आहेत. पॅरी हलकेंच ओणवा होतो. ईव्ह् झटकन् आपली मान वळवते–आणि पॅरीचे ओठ तिच्या मानेवर टेकतात.

तशा अवस्थेंत तिची नजर छत, छताची तुळई, टेबलावरील दिवा, फुलदाणींतील फुलें, पॅरीच्या आईचा फोटो, मोठा आरसा आणि पुन्हां छत अशी फिरते–आणि–

एकदम तिचें मस्तक धरून पॅरी आवेगानें तिचे ओठ आपल्या ओठांत घेतो.

ईव्ह् क्षणभर डोळे मिटून घेते–आणि मग पुन्हां सताड उघडून त्याच्या डोळ्यांत पाहूं लागते–

आणि मग एकदम पॅरीला घट्ट मिठी मारीत अत्यानंदानें ती उद्गारते–

" पॅरी, पॅरी, तू माझा आहेस! सर्वस्वी माझा आहेस!"

–आणि मग रात्रीच्या अंधारांत तीं दोघें एकमेकांच्या प्रणयांत विरून जातात–

० ० ०

सकाळ झाली आहे. कोंवळा सूर्यप्रकाश खिडकीतून आंत घुसला आहे. पॅरी कपडे चढवून ड्रेसिंगरूममधून टॉवेलनें तोंड पुसत बाहेर येतो–

" रात्रीं ते आलेच नाहींत–" तो एकदम खुषींत येऊन उद्‌गारतो.

" आणि आतां ते येणारहि नाहींत–" आरशासमोर उभं राहून केस विचारतांना ईव्ह आत्मविश्वासानें उत्तरते.

" पण कां, ते तुला माहीत– आहे का ? " तिचे खांदे धरून तो प्रश्न करतो–त्याच्याकडे प्रेममय दृष्टीनें पाहात ईव्ह म्हणते–

" होय ! ज्या वेळीं त्यांनीं दारावर थाप मारली, त्यावेळीं आपण एकमेकांवर प्रेम करायला नुकताच आरंभ केला होता–"

मग पॅरी म्हणतो.–

" आणि आपण जीवनाला पात्र ठरलों म्हणून त्यांना परत जावं लागलं–"

पॅरीला मिठी मारीत ईव्ह पुटपुटते–" पॅरी आपण जिंकलं ! "

क्षणभर दोघहि एकमेकांकडे स्निग्ध दृष्टीनें पाहतात आणि मग कसली तरी आठवण होत ईव्ह विचारते–" किती वाजले ?"

पॅरी टेबलावरील घड्याळाकडे नजर टाकून म्हणतो–" साडे नऊ ! आणखी एका तासांत काय तो निकाल लागेल–"

स्मित करीत ती पुन्हां आरशांतील प्रतिबिंबाकडे त्याचें लक्ष वेधतें–आणि विचारते–

" पुन्हां पुन्हां हें दृश्य तुला पहावंसं वाटत नाहीं ? "

" होय–"

" पॅरी आपण आपल्या नव्या जीवनांत काय काय करायचं रे ? "

" काय वाटेल तें ! आतां कांहीं आपण कोणाचे बांधलेलें नाहींत ! "

असें ते बोलत आहेत तोंच बाहेर कसलासा गलबला ऐकू येऊं लागतो. प्रथम दूरवर हळूहळूं, आणि मग जवळ जवळ आणि प्रचंड आवाजांत हा गलबला ऐकूं येऊं लागतो. रस्त्यावरून लष्कराच्यां प्रचंड हालचाली सुरू झाल्या आहेत. मोटारी आणि रणगाडे शस्त्रास्त्रांसहित कूच करीत आहेत. लष्करी फौजा थाटामाटानें मिरवीत चालल्या आहेत.

पॅरी क्षणभर कानोसा घेतो.

ईव्ह त्याच्या मुद्रेवरील फेरबदल लक्षपूर्वक न्याहाळूं लागते. ती पॅरीला एकदम विचारते–

" तुला तुझ्या सहकाऱ्यांच्याबद्दल दुःख होत आहे का ? "

" आणि तू ? तुला ल्यूसेटासाठीं खेद होत आहे का ? "

" मुळींच नाहीं ! " ईव्ह निश्चयपूर्वक म्हणते. आणि मग त्याचा हात धरून ती अस्वस्थपणानें विचारते–" आणि तू ? "

पॅरी आवेशानें आपली मान हलवून म्हणतो–

" छे, छे ! मुळीच नाही ! "

असें म्हणून तो स्वतःला तिच्या बाहुपाशांतून सोडवून घेतो. आणि खिडकीपाशीं येऊन खाली रस्त्यावर पाहूं लागतो. प्रक्षुब्ध मुद्रेने तो रस्त्यावरील लष्कराच्या हालचाली पाहूं लागतो.

" अरे बापरे .... किती वेळची ही रीघ लागली आहे ? खचित प्रचंड प्रमाणावर लष्कर सिद्ध असलें पाहिजे .... "

ईव्ह त्याच्या जवळ येते आणि त्याचा हात धरून अजीजीनें त्याला म्हणते–

" पॅरी तिकडे लक्ष देऊं नकोस .... आपण या जगांत एकाकी आहोंत...."

अस्वस्थपणें तो तिला जवळ घेत म्हणतो–

" होय खरेंच ! या जगांत आपण एकाकी आहोंत ! "

पण असें बोलतांना त्याची दृष्टि रस्त्यावर खिळली आहे. आणि त्याच्या आवाजांत कातरपणा निर्माण झाला आहे.–गहींवरून तो बोलूं लागतो–"....चल, आपण येथून दूर निघून जाऊं. तुझ्यासाठीं काबाड-कष्ट करून मी पैसा मिळवीन. त्यांतच मला सुख लाभेल. माझे सह-कारी,.... संघटना.... बंडाचा उठाव....या साऱ्या गोष्टींचें माझ्या आयुष्यांतील स्थान आतां तूं घेणार आहेस ! तुझ्याशिवाय माझ्याजवळ ' माझें ' असें आतां कोणीही उरलें नाहीं. फक्त तूं तेवढी माझी आहेस ! "

पण बाहेरच्या गलबल्याचा ध्वनि प्रतिक्षणीं वाढत जातो. इतका, कीं त्याचे अखेरचे शब्दहि ऐकू येत नाहींत. पॅरी संतापानें ओरडतो– " पण अजूनहि हें थांबलें नाहीं याचा अर्थ काय ? "

" पॅरी–" ईव्ह करुण स्वरांत म्हणते–" मी तुझी विनवणी करते– आतां फक्त आपल्या दोघाबद्दलचाच तू विचार कर. आता फक्त एकच तास उरला आहे.... "

पण पॅरी खिडकीचा पडदा दूर सारून भयचकित मुद्रेने रस्त्यावर वांकून पहात म्हणतो–

" हजारो सैनिक सिद्ध झाले आहेत. .. माझ्या सहकाऱ्यांची आज एकजात कत्तल होणार यांत शका नाहीं! "

असें म्हणून तो खिडकीपासून दूर होतो आणि दोन्ही हातांत डोकं धरून तो पलंगावर उद्विग्न होऊन बसतो. आतां त्याच्या प्रक्षोभित मनाला आवर घालणें, आणि त्याला जागृत करणे अशक्य आहे, हें ईव्हला कळून चुकते. पण तरीहि ती मोठ्या धैर्यानें म्हणते–

" पॅरी ज्यांना तू मित्र म्हणून जवळ केलेंस त्यांनीं तुझा अपमान केला, काल रात्री ते तुला ठार मारण्यासाठीं देखील आले होते–आतां त्यांची कसलीहि जबाबदारी तुझ्यावर नाही ...."

ईव्ह त्याच्यासमोर गुडघे टेकते आणि त्याला विनवते–

" पॅरी आतां कर्तव्यानं तू सर्वस्वी माझ्याशीं बद्ध आहेस ! "

शून्य मनानें तो उद्‌गारतो–" होय, तू म्हणतेस तें खरें आहे."

पण त्याचें लक्ष रस्त्यावर वाढत जाणाऱ्या लष्कराच्या वर्दळीकडे लागलें आहे.

क्षणभर तो विचार करतो. आणि कांहीं एक निश्चय करीत तो तिला म्हणतो–

" ईव्ह, मला गेलंच पाहिजे ...... "

ईव्ह भयचकित होऊन त्याजकडे पाहूं लागते. निराश मनानं ती म्हणते–" त्यांच्यासाठींच तू परतला होतास तर......? "

" छे, छे ! असं मुळींच नाहीं !" घाईनं तो तिला आश्वासन देत म्हणतो–" मी सर्वस्वी तुझ्यासाठींच परतलों आहे.... "

" मग–?"

तो त्वेषानें मान हलवीत हट्टी स्वरांत म्हणतो–" पण उघड्या डोळ्यांनी मला त्यांची कत्तल पाहवणार नाहीं......"

आणि मग तो ताडकन् उठतो, खुर्चीला लावलेला कोट अंगांत घालतो आणि पुन्हां खिडकीपाशीं जातो. बंडाच्या उठावानें त्याचें रक्त आधीच सळसळू लागलें आहे. त्याच्या मुद्रेवर काळजीच्या छटा उमटल्या आहेत. पण क्रान्तीच्या कल्पनेनें त्याला अगदीं भरतें आलें आहे.

त्याच्या मुद्रेंतील हे सूक्ष्म फरक न्याहाळीत ईव्ह हताशपणें म्हणते–

" पॅरी, अजून आपण यशस्वी झालों नाही ! आतां एक तास देखील उरला नाही......"

तो एकदम मागें वळतो आणि तिचे खांदे धरून तिला गदगदां हलवीत विचारतो–

" माझ्या डोळ्यादेखत मी त्यांची कत्तल होऊं दिली, तर अशा माणसाबद्दल तुला प्रेम वाटेल का ?"

" तू आपल्याकडून जेवढं शक्य होतं तेवढं केलेलं आहेस !"

" छे ! अजून नाहीं ! ऐक ! उठावाच्या संबंधित प्रमुखांची आणखी एका अर्ध्या तासांत अखेरची बैठक होणार आहे. मी तिथें जाऊन त्याचें मन वळवूं शकेन. निदान मला त्यांना जो इशारा द्यायचा आहे तो देईन. मग ते आणि त्यांचें नशीब ! पण साडेदहा होण्यापूर्वी मी तुझ्याकडे नक्की परत येईन, मग आपण येथून निघून जाऊं. ईव्ह, तुला माझ्या प्रीतीची शपथ आहे. या वेळीं मला जाऊं दे. नाहीतर मला माझी इतकी शरम वाटेल कीं पुन्हां आरशांत देखील मला माझें तोंड दाखवण्यास जागा उरणार नाहीं ! ......"

अगतिकतेनें ती त्याला मिठी मारत म्हणते–

" तू नक्की परतशील ? ......"

" साडेदहाच्या पूर्वी अगदीं नक्की......"

" माझ्या गळ्याची शपथ घे."

" अगदीं तुझ्या गळ्याशपथ ! "

तो दाराकडे घाईनें जाऊं लागतो. पण तेवढ्यांत त्याला अडवीत ती म्हणते–

" जा पॅरी– तूं निःशंक मनानें जा ! तुला मी जाऊं देतें आहे, हाच, माझें तुझ्यावर किती उत्कट प्रेम आहे याचा पुरावा आहे.... "

पॅरी क्षणभर थांबतो आणि तिला विचारतो–

" तूं माझ्यासाठीं इथेंच थांबणार ना ? "

" होय मी...... " ईव्ह क्षणभर घुटमळते; आणि मग एकदम आपला बेत फिरवीत ती म्हणते, " पण थांब. जमलं तर मी ल्युसेटाला भेटण्यासाठी जाईन. तू मला तिच्याकडंच टेलीफोन कर म्हणजे झालं...."

तो घाईघाईनं तिचं चुंबन घेतो आणि दाराकडे धांव घेतो. ईव्ह प्रेमळपणें त्याला बजावते– " आणि मी घातलेली शपथ विसरूं नकोस हं ! "

पॅरी निघून जातांच मनाशीं कांहीं एक निश्चय करीत ईव्ह टेबलाच्या खणांतून पॅरीचें पिस्तुल बाहेर काढते आणि आपल्या छोट्या बॅगमध्यें लपविते. खोलींतून बाहेर पडण्यापूर्वी ती बिछान्याजवळ येते. आदल्या रात्रीं तिनें केसांत घातलेलें गुलाबाचें फूल उशीवर पडलें आहे. तें ती हळूवारपणें उचलते आणि आपल्या मृदु बोटांनीं तें पुष्प कुरवाळीत ती बाहेर पडते.

## रस्त्यावर–

सायकल घेऊन पॅरी रस्त्यावर येतो. आणि आजूबाजूला चाहूल घेऊन समोरच्या मनोऱ्यावरील घड्याळाकडे नजर टाकतो. घड्याळांत दहाला वीस मिनिटें कमी आहेत. लगबगीनें तो सायकलवर टांग मारतो आणि वेगानं दवडतो. त्याच्यापासून दहा पावलें अंतरावर भिंतीआड ल्यूसीन पॅरीच्या प्रयाणावर लक्ष ठेवून उभा आहे. पॅरीच्या पाठोपाठ तोहि आपली सायकल रस्त्यावर घेतो. आणि आपल्याला कोणी पाहत नाहीं, याची खात्री करून घेऊन तो पॅरीचा पाठलाग करूं लागतो.

## चालियरच्या बंगल्यावर—

हलकेंच दार उघडून ईव्ह आपल्या घरांत प्रवेशते. तिची मुद्रा गंभीर आणि कठोर दिसत आहे. दर्शनी दालनांतून पाऊल न वाजवतां ती आंत जाऊं लागते. जातां जातां मोठ्या आरशांत तिचें प्रतिबिंब उमटतें; पण तिकडे ती लक्ष देत नाही. शय्यागृहाचें दार उघडण्यापूर्वी ती आजूबाजूला कानोसा घेते. आणि मग ती हलकेंच दार उघडते. आँद्रे आणि ल्यूसेटा एकमेकांना लगटून कोचावर बसलेलीं तिला दिसतात. सकाळची न्याहारी आटोपून तीं दोघें एकमेकाजवळ सलगीनं गप्पा मारीत बसलीं असावींत असें दिसतें. ईव्ह हलकेंच आंत येते. आणि दार बंद करून बोल्ट सरकवते. त्याबरोबर आँद्रे आणि ल्युसेटा मागें वळून पाहतात आणि दचकतात. आँद्रे भयानें पांढरा फटफटीत पडतो. ल्यूसेटा झटकन् सावरून बसते. दोघेहि विस्मयचकित होऊन ईव्हकडे पाहू लागतात. त्या दोघांकडे रोखून पाहत ईव्ह निश्चयी पावलांनी त्याच्याजवळ येते. आँद्रे गडबडीनें उठून उभा राहतो. ईव्ह थबकून त्यांच्या डोळ्यांतले आश्चर्य पाहून म्हणते—

" होय! आँद्रे, मी परत आलें आहें! "

" कोणत्या तोंडानं परतलीस तू? शरम नाही वाटली माझ्या घराची पायरी चढतांना? "

—आँद्रे संतापाने ओरडतो.

पण त्याच्या बोलण्याकडे लक्ष न देतां ईव्ह शांतपणें एका आराम खुर्चीवर बसते. तिच्यासमोर ल्यूसेटा दांतखिळी बसल्याप्रमाणें तोंड मिटून दुसऱ्या एका खुर्चीवर बसलेली आहे. एकदम आँद्रे ईव्हच्या जवळ जाऊं लागतो. जणू तो तिला हाताला धरून बाहेर काढणार आहे. त्याबरोबर ईव्ह चपळाईनें बॅगमधील पॅरीचें पिस्तुल बाहेर काढते, आणि तें आँद्रेवर रोखीत दरडावून म्हणते—

" खाली बस! "

आँद्रे गडबडतो, गोंधळतो. ल्यूसेटा भयानं किंचाळते. ईव्ह हुकमी स्वरांत पुन्हां म्हणते—

" खालीं बस, म्हणून सांगितलं ना ? "

ल्यूसेटा उठू लागताच ईव्ह तिला दरडावते–

" ल्यूसेटा, आहेस तिथेंच मुकाट्यानं स्तब्ध रहा ! जरा गडबड केलीस तर आँद्रेला मी ठार मारीन ! "

ल्युसेटा थरथर कांपत खाली बसते. नाइलाजानें चरफडत आँद्रे तिच्याजवळ जाऊन बसतो. त्याच्यावर पिस्तुल रोखून ईव्ह शांतपणें म्हणते–

" आँद्रे, किती मूर्ख आहेस तू ! आतां या जगांत मला कांहीहि गमावण्याची भीति नाही. मी फक्त एक टेलिफोन येण्याची वाट पाहत राहिलें आहे. त्याच्यावर माझें भवितव्य अवलंबून आहे. पण त्यापूर्वी मी तुला कांहीं गोष्टी सुनावणार आहे. आणि त्याही ल्यूसेटा इथं असतांना, तिच्यासमोर ! मी तिला, मला जेवढं माहीत आहे तेवढं तुझं चरित्र सांगणार आहे. आणि मी तुला बजावून ठेवतें, जर तूं खोटं बोललास, अथवा जें मी सांगणार आहे तें ऐकूनहि, तिच्या मनांत तुझ्याबद्दल तिरस्कार निर्माण झाला नाही, तर हें पिस्तुल मी तुझ्या छातीवर रिकामें केल्याखेरीज राहणार नाहीं ! "

आँद्रे आणि ल्यूसेटा भीतीनें थरथर कांपू लागतात.

" मी काय म्हणतें आहे, तें तुम्हांला मान्य आहे कीं नाहीं ? " ईव्ह दरडावून विचारते.

दोघांच्याहि तोंडून शब्दच फुटत नाहीं. तें पाहून ईव्ह बोलूं लागते–

" ठीक आहे तर ! माझ्या हकीकतीला मी सुरवात करते....आठ वर्षांपूर्वी, आँद्रे, तूं आपल्या बापाचा पैसा ख्यालीखुशालींत उधळून टाकलास आणि स्वतः कफल्लक झाला होतास. आणि एका श्रीमंत वधूच्या शोधांत तूं हिंडत होतास.... "

## क्रान्तिकारकांच्या तळावर–

शहराबाहेर एका जुनाट पडक्या गॅरेजवजा छपराखालीं सुमारें पंचवीस तीस माणसें एकत्र जमली आहेत. ह्या मंडळीच्या मध्यभागीं

डिक्सन आणि लँगलॉय, एका मोडक्या ट्रकचा व्यासपीठासारखा उपयोग करून, ह्या माणसांना उद्देशून बोलत आहेत.

डिक्सन आपलें भाषण संपवित म्हणतो– " ......आणि भाई हो! या तुम्हांला आतां अखेरच्या सूचना देण्यांत आलेल्या आहेत! आपापल्या जागीं शक्य तितक्या लवकर जाऊन तुम्ही दबा धरून बंडाच्या उठावाची वाट पहा. आणखी वीस मिनिटांतच या उठावाला आरंभ होईल."

जमलेले कामगार पुढारी प्रक्षुब्ध मनानें ऐकत आहेत. त्यांच्यापैकीं बहुतेक सारे तिशीच्या आसपासचे उसळत्या रक्ताचे नवजवान कामगार आहेत.

डिक्सनचें भाषण आटोपतांच क्षणभर वातावरण स्तब्ध राहतें.

आणि मग एकदम अनेक आवाज उमटूं लागतात–

" आणि ड्यूमेन ? "

" या इथं ड्यूमेन कां आला नाही ? "

" ड्यूमेनने फितुरी केली आहे असं आम्ही ऐकलं हें खरें आहे काय? "

डिक्सन दोन्ही हात वर करून या आवाजांना शांत राहाण्याची सूचना देतो.

" भाई हो, मी आतां पॅरी ड्यूमेनसंबंधानेंच निवेदन करणार आहे...... "

इतक्यांत एका गल्लींतून पॅरी वेगानें सायकलवरून छपरापाशीं येऊन पोहोंचतो. सायकलवरून चटकन् उडी मारून तो छपराच्या दाराशीं जातो. पण दार आंतून बंद आहे, हें पाहतांच तो छपराच्या मागील बाजूला जी बाग आहे, तिकडे धांव घेतो. ह्या बागेच्या कुंपणावरून तो सफाईनें उडी मारतो. पाठोपाठ घामाघूम झालेला ल्यूसीन धांवत धांवत तेथें येतो. पॅरी त्याला दिसेनासा होतांच तो विरुद्ध दिशेनें पळूं लागतो. बाग ओलांडून पॅरी एका खिडकीपाशीं येऊन उभा राहतो. या खिडकीवर उभा राहून पॅरी आंतल्या घडामोडी पाहूं लागतो.

डिक्सन बोलत आहे– " आम्ही वेळींच सावध झालों आणि त्याला पकडलें, परंतु आपल्या कृत्यांचा एका शब्दानेंहि त्याला खुलासा करतां येईना ? त्याऐवजीं तो आज फरारी झाला आहे."

"खोटं आहे हें !" एकदम पॅरीचा आवाज उमटतो.

माना वळवून सगळे खिडकीकडे पाहूं लागतात. पॅरी खिडकीवर चढून आंत उडी टाकतो आणि डिक्सन व लॅंगलॉय जेथें उभे आहेत, तेथें येऊन उभा राहतो. दोन्ही हात खिशांमध्यें ठेवून ताठ उभा राहून, मान उंचावून तो बोलू लागतो–

"भाई हो, मी तुमच्यांत आलों आहे ! होय ! एक विश्वासघातकी, ज्यानं तुम्हांला क्षुद्र रकमेवर बादशहाला विकून टाकलं, आणि जो नंतर फरारी झाला, तो पुन्हा तुमच्यासमोर उभा आहे."

प्रत्येक कामगाराच्या नजरेला नजर देऊन पॅरी बोलूं लागतो–"....ज्या वेळेला तुमचं धैर्य खचलेलं होतं, त्या वेळेला तुम्हांला धीर देऊन तुमच्यांत वीरश्री कोणी निर्माण केली ? ही तुमची संघटना कोणी निर्माण केली ? लष्करशाहीच्या विरुद्ध आज कित्येक वर्षे कोणी आघाडी निर्माण केली ?" असं बोलत बोलत पॅरी लॅंगलॉय आणि डिक्सन यांच्याकडे बोट दाखवून म्हणतो– "काल लॅंगलॉय आणि डिक्सन यांनी माझ्यावर अत्यंत घाणेरडे आरोप केले. पण त्यांच्यासमोर मी एक शब्दहि बोललों नाहीं. कारण तुमच्यासमोर मला माझी कैफियत सादर करायची होती आणि ती माझ्यासाठी नव्हे ! तर तुमच्यासाठी ! तुमची सगळ्याची फस-होऊन, तुम्ही सारे विनाशाच्या दरीत कोसळूं नये याच्यासाठी......"

## टेलीफोन बूथमध्यें–

ल्यूसीन जवळच्याच एका टेलीफोनबूथमध्यें शिरतो आणि थडधडत्या छातीनें डायल फिरवून तो रिसिव्हर कानाला लावतो. आणि पुनःपुन्हां तेथून छपराकडे पाहूं लागतो.

## पोलीस कचेरींत–

पोलीस अधिकारी आपल्या कचेरींत मध्यभागीं, टेबलावर एक नकाशा मांडून बसले आहेत. त्यांच्या आसपास दुय्यम अधिकारी उभे आहेत. कसली तरी महत्त्वाचीं खलबतें त्यांच्यांत चाललीं आहेत, आणि मनसुबे रचले जात आहेत.

टेलिफोन खणखणूं लागतो. मुख्य अधिकारी रिसीव्हर उचलून कानाला लावतो, आणि ऐकू लागतो, आणि मग एकाएकी घाईनें, विचित्र मुद्रा करून तो आपल्या दुय्यम अधिकाऱ्यांना खुणावतो. जणूं त्या बातमीसाठीं ते सारे वाट पहात आहेत तीच त्यांना गवसली आहे!

" ...हं-हं ... अस्सं, ... अस्सं ... होय ... होय ..."

एकदम आपल्या दुय्यम चिटणिसाकडे वळून तो हुकूम देतो-" हा पत्ता टिपून घ्या......कॅरेफो-द अल्हाईन......पूर्वीचें मालट्रकस्चें गराज...."

## क्रांतिकारकांच्या तळावर-

आपलें निवेदन संपवून पॅरी भावनाविवशतेनें म्हणतो-

" भाई हो, तुमचा माझ्यावर विश्वास आहे की नाही ?"

डिक्सन चढ्या आवाजांत म्हणतो-" भाई हो-"

पण पॅरी अेकदम त्याच्या अंगावर ओरडतो-" डिक्सन, मध्यें बोलूं नकोस! माझं भाषण संपल्याखेरीज मी तुला बोलू देणार नाही." आणि जमलेल्या कामगारांकडे बोट दाखवून तो म्हणतो- " जोंपर्यंत या सर्व कामगारांनी मला हांकलून दिलें नाहीं, तोंपर्यंत अजूनहि नेतृत्वाचीं सूत्रें मी खालीं ठेवणार नाहीं."

त्याबरोबर अेक आवाज उमटतो-"मग चार्लीयरच्या बायकोचं काय?"

" अस्सं ! " पॅरी उद्गारतो-"तुम्हांला त्याबद्दल माहिती हवी आहे तर! होय. माझी तिची मैत्री आहे अन् तिनं माझ्यासाठीं काय केलं, हें तुम्हांला माहीत आहे? आपल्या नवऱ्याला सोडून ती माझ्याबरोबर राहण्यासाठीं आली आहे! तिनेंच मला आपला घात झाला असल्याची बातमी दिली."

अस्वस्थपणें येरझारा घालीत तो बोलू लागतो-" लष्कराच्या तीन रेजिमेंटस् काल रात्रीं शहरांत शिरल्या आहेत."

डिक्सन आणि लॅंगलॉय यांच्याजवळ येऊन तो त्यांना उद्देशून बोलूं लागतो. पॅरीचें बोलणें त्यांनाहि पटूं लागल्यासारखें दिसतें.

" बादशहाला तुमच्या आमच्यापैकीं प्रत्येकाचीं नांवें माहीत झालीं आहेत. आपले काय उद्योग चालले आहेत त्याची त्यांना बित्तंबातमी

आहे. त्यांनीं मुद्दामच आपल्या मार्गांत आजवर अडथळे आणले नाहींत. कारण योग्य अशी संधि पाहून त्यांना आपली कत्तल करायची आहे. आणि ही संघटना ठेंचून टाकायची आहे. ''

" हें खरं कशावरून ? याला पुरावा काय ? "

पॅरी समुदायाकडे वळून एकदम उत्तरतो– " कांहीं नाहीं ! हा विश्वासाचा प्रश्न आहे. ज्या माणसानं तुमच्या बरोबर दहा वर्षं अहोरात्र खांद्याला खांदा भिडवून काम केलें, त्याला तुम्ही हुसकावून लावणार आहांत, कीं त्याचा शब्द मानणार आहांत ? ''

या शद्बांचा कामगारांच्या मनावर बराच परिणाम होतो.

पॅरी पुन्हां विचारतो– " समजा मी फितुरी केली असती, तर या वेळीं मी इथं तडफडायला कशाला आलों असतों ? ''

त्याबरोबर बंडवाल्यांपैकीं एक पुढारी पॅरीच्याजवळ येऊन उभा राहतो आणि म्हणतो–

" भाई हो, माझा पॅरीवर विश्वास आहे. आजपर्यंत त्यानें आपल्याला कधींहि फसवलं नाहीं ! '' एका पुढाऱ्यानें पाठ फिरवतांच, भराभरा सारे पुढारी पॅरीच्या बाजूला येऊन उभे राहतात. त्यांचा गलबला शांत करीत पॅरी म्हणतो– " मग माझं तुम्ही ऐकलं पाहिजे. आज आपण कांहीं एक करतां कामा नये. ''

इतक्यांत छपराच्या कोपऱ्यांत असलेला एक टेलिफोन खणखणूं लागतो. लॅंगलॉय चटकन् ट्रकच्या खाली उडी मारतो. आणि टेलिफोन-बूथमध्यें शिरतो. बाकीचे सर्व स्तब्धपणें लॅंगलॉयकडे पाहूं लागतात.

" होय......होय......कुठं ?......नाहीं–नाहीं......काय ?.. छे, छे....मुळींच नाहीं....हुकूम मिळेपर्यंत वाट पहा...... ''

लॅंगलॉय रिसीव्हर खालीं ठेवतो आणि घाईनें भयग्रस्त मुद्रा करून बूथमधून बाहेर येतो,

" घात झाला ! उठावाला आरंभ झाला ! उत्तरविभागांतील कामगारांनीं हल्ल्याला आरंभ केला ! ''

सारे कामगार पुढारी पॅरीकडे बुडत्या आशेनें पाहूं लागतात. पण पॅरीच्या मुद्रेवर अगतिकता आणि असहायता उमटलेली त्यांना दिसते. पाठ वळवून कपाळाला हात लावून पॅरी जाऊं लागतो. डिक्सन धावून जाऊन पॅरीला अजीजीनें म्हणतो– " पॅरी, पॅरी, आतां रे काय करायचं ? "

पॅरी भडकून उत्तरतो– " आतां काय करायचं ? आतां कपाळाला हात लावून रडत बसायचं ! मी सांगत होतों, त्या वेळेला तुम्हांला पटलं नाहीं. आतां तुम्हांला काय वाटेल तें तुम्ही करा. माझं अंग मीं काढून घेतलं आहे ! "

पण असं म्हणूनहि तो निघून जात नाहीं. खिशांत हात घालून पुन्हा कामगारांच्यामध्यें तो येतो आणि त्यांच्याकडे पाहूं लागतो.

डिक्सन कळवळून म्हणतो–" पॅरी, आमची चूक झाली. पण आतां आम्हांला तोंडघशीं पाडूं नकोस. आतां कांहीं करतां आलं, तर तूंच करूं शकशील. त्यांचे सारे बेत तुला माहीत आहेत."

पॅरी क्षणभर विचारमग्न होऊन स्तब्ध उभा राहतो. आणि मग एकाएकी कसलीतरी आठवण होऊन कडवटपणें हंसून तो विचारतो–" किती वाजले ? "

डिक्सन घड्याळांत पाहून म्हणतो– " दहा वाजून वीस मिनिटें."

तें ऐकून पॅरीची मुद्रा काळवंडते. तरी देखील धैर्यानें तो म्हणतो– " ठीक आहे. तुम्हांला सोडून मी जाणार नाही ! " आणि मग एकदम डिक्सनकडे वळून तो म्हणतो– " एक मिनिट थांबा. मला एक महत्त्वाचा टेलिफोन करायचा आहे."

असें म्हणून पॅरी टेलिफोनबूथकडे वळतो. आंत जाऊन दार बंद करून घेतो.

तेथून पांचसहा पावलांच्या अंतरावर, आड उभे राहून, ल्यूसीन त्याच्यावर पाळत ठेवीत आहे.

## चार्लीयरच्या घरीं–

कोचापाठीमागें ईव्ह हातांत पिस्तुल घेऊन उभी आहे. आँद्रे आणि ल्यूसेटा अजूनहि एकमेकांला लगटून बसलीं आहेत. ईव्हचें निवेदन नुकतेंच संपलें आहे. अखेर ती म्हणते–

" ल्यूसेटा, आँद्रेचें चारित्र्य हें असें आहे. खरं आहे की नाहीं आँद्रे ?"

भयानं आणि दुखावलेल्या अहंकारानं आँद्रे इतकेंच उत्तरतो–

" मी उत्तर देणार नाहीं. तूं पिसाळली आहेस झालं ! "

ईव्ह खालीं वांकते आणि आँद्रेच्या खिशांतून किल्ल्यांचा जुडगा बाहेर काढते. आणि तो ल्यूसेटापुढं टाकीत ती म्हणते–"ठीक आहे ! ल्यूसेटा, या किल्ल्या घे. आणि आँद्रेच्या टेबलाच्या खणांत पत्रांचा गठ्ठा आहे, तो घेऊन ये–"

ल्यूसेटा यत्किंचित्‌हि हालचाल करीत नाहीं, तें पाहून ईव्ह दरडावून म्हणते–

" जा म्हणते ना ? तुला आँद्रेच्या जीवाची कांहीं काळजी असेल तर ऊठ, अेकदम ऊठ !–"

ल्यूसेटा अेकदम् उठून किल्ल्या घेऊन दाराकडे जाऊं लागते.

इतक्यांत टेलिफोन खणखणू लागतो.

तो घेण्यासाठीं आँद्रे उठू लागतो. पण इतक्यांत रिसीव्हर उचलीत ईव्ह त्याला दरडावते–" हलू नकोस ! फोन माझ्यासाठी आहे ! "

ईव्ह भितीला टेकून रिसीव्हर कानाला लावते. दुसऱ्या हातांतलें पिस्तुल ती आँद्रेवर रोखून धरते.

" हॅलो ...."

एकदम तिचा स्वर मृदु होतो.

" कोण पॅरी.... आणि मग ? "

क्षणभर ती ऐकते. तिच्या मुद्रेवर चिंतेची आणि उद्वेगाची छाया पडं लागते.

" छे.... छे.... पॅरी असं करूं नकोस.... "

भावनावशतेनें ती उद्‌गारते–

" नाहीं.... नाहीं.... तें शक्य नाहीं. पॅरी तूं ठार होशील .... पॅरी लक्षांत ठेव मी तुझ्यावर प्रेम करतें आहे. माझे पंचप्राण तुझ्या-वाटेकडे लागले आहेत. एकमेकांवर प्रेम करण्याकरितां आपण परत आलों हें विसरूं नकोस....."

## क्रांतिकारकांच्या तळावर--

बूथला लावलेल्या कांचेच्या दारांतून पॅरी फोनवर बोलतांना दिसत आहे. त्याची मुद्रा चिंताग्रस्त पण निश्चयी दिसत आहे.

" ....ईव्ह.... कृपा करून मी काय म्हणतों, तें समजून घे....तूं माझं ऐकलं पाहिजेस. त्यांना असं असहाय स्थितींत सोडून मी तुझ्याकडं येऊं शकत नाहीं .... किती झालं तरी ते माझे सहकारी आहेत.... होय, त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं, हें मला ठाऊक आहे....तरी पण मी त्यांना सोडून येऊं शकत नाहीं......"

–त्याच्या डोक्यावर टांगलेल्या विजेच्या घड्याळांतले कांटे दहा वाजून एकोणतीस मिनिटें झाल्याचें दर्शवितात.

## तळाबाहेर--

सैनिकांनीं टिच्चून भरलेल्या दोन भल्या मोठ्या ट्रक्स् भरधाव वेगानें येतात आणि छपराबाहेर उभ्या राहतात. आंतले सैनिक भराभरा खालीं उड्या टाकतात. आणि छपराभोंवतीं वेढा घालूं लागतात–

## चार्लीयरच्या घरीं--

ईव्हच्या हातांत अजूनहि टेलिफोन आहे. निराश मनानें ती पॅरीला म्हणते आहे–

" छे छे, तू असं करूं नकोस......तू मला खोटं बोललास...... तूं माझा घात करतो आहेस.... तू माझ्यासाठीं परतला नव्हतास...... तुझं माझ्यावर कधींच प्रेम नव्हतं ! "

## क्रांतिकारकांच्या तळावर--

" छे, छे, असं मानूं नकोस ईव्ह ! माझं तुझ्यावर खरोखरीच प्रेम आहे. पण माझ्या सहकाऱ्यांना असं वाऱ्यावर सोडून मी कसा येऊं ?..."

ल्यूसीन दबा धरून मोक्याची जागा गांठून बसला आहे, हें पॅरीला दिसत नाहीं. ल्यूसीम हलकेंच खिशातून पिस्तुल काढतो आणि पॅरीवर

काळजीपूर्वक नेम धरतो–भावविवशतेनें पॅरी म्हणत आहे–"······ईव्ह ईव्ह .... "

ल्यूसीन माथेफिरूपणानें बरोबर नेम साधीत पिस्तुल झाडतो.

त्याचवेळीं घड्याळांत दहा वाजून तीस मिनिटें झाल्याचा ठोका पडतो !

## चार्लोयरच्या घरीं--

रिसीव्हरमधून पिस्तुल झाडल्याचा आवाज आणि पॅरीची किंकाळी ईव्हच्या कानी पडते. ईव्हचे पाय लटपटतात. जणूं तिलाच कोणीतरी गोळी घातल्याप्रमाणें ती निष्प्राण होऊन खाली कोसळते.

त्याबरोबर आँद्रे पुढें धांवतो आणि ल्यूसेटा किंचाळते.

## क्रान्तिकारकांच्या तळावर--

टेलिफोन बूथच्या दाराचीं कांचेचीं तावदानें फुटलीं आहेत. कांहीं कामगार घाईने तिकडे धांवतात. त्यापैकीं एक पुढें होऊन दार उघडतो. दार उघडतांच पॅरीचा रक्तबंबाळ निष्प्राण देह खालीं कोसळतो.

त्याच वेळी मोठ्यानें गलबला होतो. कामगार ओरडतात–

" लष्कर आलें ...... लष्कर आले ! ...."

आणि मग एकदम मशिनगनमधून गोळ्यांचा वर्षाव सुरूं होतो. छपराच्या दरवाजाचें कुलूप निखळून पडतें. आणि दार सताड उघडतें. फटवाल्यांची पांगापांग होते आत्मरक्षणासाठीं सर्व कामगार शस्त्रास्त्रें घेऊन सांपडेल त्या ठिकाणीं दबा धरून बसू लागतात. खिडक्या खिडक्यांतून लष्करी अधिकारी अश्रुधुराचे बॉम्ब आंत फेकू लागतात. छपरांत अश्रुधूर पसरूं लागतो. सैनिकांच्या गोळीबाराला कामगार गोळीबारानेंच प्रत्युत्तर देऊं लागतात. पण ही बुडत्याची धडपड चालली आहे.

डिक्सन आणि लँगलॉय ट्रकच्या आडून गोळीबार करीत आहेत. त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधूरामुळें पाणी वाहूं लागलें आहे. सारेच कामगार खोकूं लागतात. आणि डोळे चोळूं लागतात.

एक गोळी विजेच्या घड्याळांत घुसते आणि घड्याळांत साडेदहावर कांटे असतांनाच तें बंद पडतें.

त्याच क्षणीं पॅरी हलकेंच आपल्या मृतदेहांतून उठून उभा राहतो– आणि सभोंवतालीं चाललेला प्रकार विस्मयानें पाहूं लागतो. तो क्षणभर दारांत येऊन उभा राहतो; सभोंवतालीं नीट निरखून पाहतो; आणि मग किंचित खांदे उडवीत तो धुराच्या लोटामधून मार्ग काढीत छपराबाहेर येऊं लागतो.

बाहेर छपराच्या दाराशीं सैनिक बंदुका रोखून कामगार शरण येण्याची वाट पहात उभे आहेत. पॅरी थंडपणें त्यांना ओलांडून निघून जातो.

## उद्यानांत–

उद्यानांतील उपाहारगृहहि बंडाच्या धुमश्चक्रीतून सुटलेलें नाही. भिंतीवर बंदुकीच्या गोळयांच्या खुणा उमटलेल्या आहेत. दाराचीं तावदानें फुटलीं आहेत. झाडांच्या फांद्या आणि पानें इतस्ततः विखुरली आहेत. टेबलें आणि खुर्च्या यांची रगडून नासधूस व फेकाफेंक झालेली आहे.

एका बाकावर पॅरी आणि ईव्ह बसली आहेत. एकमेकाशेजारी पण एकमेकांपासून किंचित् दूर! त्यांच्या आजूबाजूला सारें ओसाड झालें आहे. दूरवर कांही मृतात्मे एकएकटेच भटकत आहेत.

अखेर ईव्ह पॅरीकडे पाहून स्निग्धपणें म्हणते–

"पॅरी, तुला निराश व्हायचं कारण नाही ! कोणीतरी दुसरे लोक तुझं कार्य पुरं करतील ?"

"तें मला कळतं. पण 'दुसरे' लोक करतील. मी नाहीं ! .."

"गरीब बिचारा......" ईव्ह स्वतःशींच पुटपुटते.

"आणि ल्यूसेटाचं काय ?" पॅरी मान वर करून विचारतो.

आपले खांदे उडवीत ईव्ह उद्गारते–"वेडी पोर......मी कांहीं तिला अधःपतनापासून वांचवूं शकलें नाहीं." आणि प्रथमच मृतात्म्यांना शोभेलशा बेफिकीरीनें ती म्हणते–" पांच पंचवीस वर्षांत तीहि आपल्याप्रमाणें मृत होऊन इकडेच येणार आहे....तेव्हां तिची काळजी कशाला ?.... चिमुकलेंच जीवन ! पण तेंहि...."

मग क्षणभर दोघेहि स्तब्ध राहतात.

एकदम त्यांच्या कानीं शब्द पडतात–

" तुम्ही ?—आणि इथं ? मला नाही वाटलं तुम्ही इथें सापडाल असं ?"

ईव्ह आणि पॅरी वळून पाहूं लागतात. त्यांच्यासमोर तो अठराव्या शतकांतला, पॅरीचा म्हातारा वाटाड्या येऊन उभा राहिला आहे. तो विचारतो—

" तुमचं बंड यशस्वी झालं नाही का ?"

" सहाशें लोक ठार झाले आणि एक हजारावर लोकांना अटक झाली." पॅरी शरमिंदेपणानं उद्गारतो;—आणि उठावाच्या दिशेकडे बोट दाखवीत म्हणतो— " अजून एवढ्यानं संपलं नाही. अजूनहि धरपकड आणि कत्तल चाललीच आहे !"

" आणि तुम्ही दोघं....तुम्हीहि......?" म्हातारा घुटमळत विचारतो.

" नाही !" ईव्ह खिन्नपणें उद्गारते—" आम्ही पराजित झालों आहोंत ! दैवाचे फासे आमच्या उलट पडले ! उधळलेला डाव कांही पुन्हा मांडतां येत नाही, हेच खरे !"

" मला तुमच्याबद्दल फार सहानुभूति वाटते......" म्हातारा उद्गारतो.

तेवढ्यांत एक देखणी तरुणी त्या बाजूनें जाऊं लागते. त्याबरोबर तो म्हातारा लगबगीनें ईव्ह आणि पॅरीचा निरोप घेत म्हणतो— " बराय् जातों मी ! आमच्या मंडळांत तुमची इच्छा असली तर जरूर येत चला.."

असें बोलून उत्तरासाठीं न थांबतां म्हातारा सटकतो. क्षणभर तो गेल्या दिशेला ईव्ह आणि पॅरी उदासपणें पाहूं लागतात. मग पॅरी एकदम ईव्हला म्हणतो—

" ईव्ह, मीं तुझ्यावर प्रेम केलं होतं...."

" मुळींच नाहीं. उगीच कशाला खोटं बोलतोस, पॅरी ?"

" खरंच ! अगदी मनापासून मीं तुझ्यावर प्रेम केलं." आत्मविश्वासानं तो तिला म्हणतो.

" कदाचित् तू म्हणतोस तें खरं असेल. पण आतां त्याचा काय उपयोग आहे ?" असं म्हणून ईव्ह उठते. तिच्या पाठोपाठ उठत पॅरी उदासपणें पुटपुटतो— " खरं आहे ! आतां त्याचा काय उपयोग ?"

क्षणभर ते दोघे एकमेकासमोर उभे राहून खिन्न उदासीन मुद्रेनें एकमेकांकडे पाहतात. मग पॅरी ईव्हला विचारतो–

" तूं त्या मंडळांत येणार का ? "

" कदाचित्– नक्की नाहीं ! "

" बरं आहे तर मग....पुन्हां आपण कधींतरी भेटूं."

निरोप घेतांना तीं दोघें हस्तांदोलन करतात. आणि वेगवेगळया दिशेनें जाऊं लागतात.

इतक्यांत एक तरूण आणि एक तरुणी धांवत धांवत समोरून त्यांच्या शोधांत येतात. त्याबरोबर ईव्ह आणि पॅरी थबकतात. ती तरुणी बालिश उत्साहानें विचारते–

" तुम्ही मृत आहांत काय ? "

पॅरी माननेंच होय म्हणतो.

ती तरुणी म्हणते–" आतांच आम्हां दोघांच्या लक्षांत आलं आहे कीं आम्हीं दोघं एकमेकांकरितां जन्माला आलों आहोंत–....

आणि पृथ्वीतलावर असतांना आमची कधीच भेट होऊं शकली नाहीं. .... कोणीतरी आम्हांला सांगितलं कीं १४० कलमान्वयें आम्हांला परत मृत्युलोकीं जातां येईल म्हणून. तुम्हांला कांहीं माहीत आहे कां त्याबद्दल?" तो तरुण उतावळेपणानें विचारतो.

पॅरी ईव्हकडे पाहून अर्थपूर्ण स्मित करतो आणि मग त्या तरुणास म्हणतो–

" मृतात्म्यांच्या कचेरींत जाऊन तुम्ही चौकशी करा. त्या ठिकाणीं तुम्हांला हवी असलेली माहिती मिळेल......"

ती तरुणी ईव्हकडे वळून म्हणते–"....या कचेरीचाच आम्ही इतका वेळ शोध करीत आहोंत. कुठें आहे ती कचेरी ? "

हंसून ईव्ह उद्ध्वस्त झालेल्या नृत्यगृहाकडे बोट दाखवीत म्हणते–

" जा आणि त्या गृहांत तुम्हीं नृत्याला आरंभ करा, आणि खरो-खरीच जर तुम्हीं एकमेकांवर प्रेम करीत असाल तर मृतात्म्यांची कचेरी आपण होऊन तुमचा शोध काढीत तेथें येईल ...."

तीं दोघें विलक्षण आश्चर्यचकित होतात. क्षणभर ईव्हच्या शब्दावर विश्वास ठेवावा किंवा नाहीं या विचारांत तीं दोघें पडतात. पण त्यांचा झटकन् विश्वास बसतो. मग ईव्ह आणि पॅरी याचे आभार मानून तीं दोघें एकमेकाला बिलगून त्या उद्ध्वस्त नृत्यगृहाकडे जाऊं लागतात पण इतक्यांत त्या तरुणाला पॅरीच्या मुखावरील हास्य पाहून कांहीं शंका येते–आणि तो मागें वळून पुन्हां निरागसपणें विचारतो–

" तुम्ही अशा विचित्र नजरेनं हंसून आमच्याकडे कां पाहतां ? तुम्ही आमची चेष्टा तर केली नाही ना ?... यांतून कांहीं वाईट तर निष्पन्न होणार नाहीं ना ? "

ईव्ह आणि पॅरी एकमेकांकडे पाहतात–आणि मग त्या प्रेमिकांच्याकडे पाहून प्रेमळपणें स्मित करतात.

" प्रयत्न करून तर पहा ? " पॅरी प्रेमळपणें सुचवितो.

" होय, प्रयत्न करायला कांहींच हरकत नाही ! " ईव्ह पुटपुटते.

या आश्वासनानें उत्तेजित होऊन ती दोघें एकमेकांचा हात हातांत घेऊन नृत्यगृहाकडे धांवत सुटतात.

ती दोघे निघून जातांच पॅरी अत्यंत प्रेमळपणे ईव्हकडे वळून तिला हात वर करून निरोप देतो. ईव्हदेखील त्याचा निरोप घेते. आणि मग दोघेहि जड अंतःकरणानें आणि पराजित मनाने दोन भिन्न दिशेला निघून जातात.

–आणि मग त्या ओसाड आणि उद्ध्वस्त नृत्यगृहांत ते दोन प्रेमिक पुनर्जीवनाच्या आशेनें परस्परांना बिलगत एकटेच नृत्य करूं लागतात.



# आमचीं कथा–कादंबऱ्यांचीं प्रकाशनें

## ( किंमती नसलेलीं पुस्तकें शिल्लक नाहींत )

### कादंबरी

| | रु. |
|---|---|
| १ ठिगळ: वि. वि. बोकील | ४ |
| २ गांठभेट ,, | ५ |
| ३ मायेची शाल ,, | |
| ४ जेह्लम: ना. सी. फडके | ६ |
| ५ हंसूं आणि आंसूं: ना. सी. फडके | ५ |
| ६ रेशमाच्या गांठी: दत्त रघुनाथ कवठेकर | ५ |
| ७ अपुरा डाव: दत्त रघुनाथ कवठेकर | ४ |
| ८ कांटेरी मार्ग: सौ. मालती दांडेकर | |
| ९ विझती ज्योत: शांता ज. शेळके | ५ |
| १० चुकामूक: दत्तू बांदेकर | १॥ |
| ११ मालकंस: गोपीनाथ तळवलकर | ३॥ |
| १२ मला काय त्याचें: स्वा. वि. दा. सावरकर | |
| १३ भूकंप: ग. भा. निरंतर | २॥ |
| १४ पूर्वेचा वारा: लीला देशमुख | ५ |
| १५ आशेचे किरण: प्रा. वा. भा. पाठक | २॥ |
| १६ झंझावात: ना. सी. फडके | |
| १७ पद्मा: गो. नी. दांडेकर | ३ |
| १८ घर: वसंत कानेटकर | ३ |
| १९ खेळणीं-ना. सी. फडके | ५ |
| २० सुषमा-ना. सी. फडके | ५ |
| २१ चाहूल: ना. सी. फडके | |
| २२ उद्धार: ना. सी. फडके | ७॥ |
| २३ जीवन: वसंत सांगळे | १॥ |
| २४ तेथें चल राणी: वसंत कानेटकर | २॥ |

### कथासंग्रह

| | रु. |
|---|---|
| १ अमृतकण: वि. वि. बोकील | |
| २ गोड सोबत: ,, | २ |
| ३ अभ्यंगस्नान: ना. सी. फडके | ३ |
| ४ चंद्रज्योति: सौ. मालती दांडेकर | |
| ५ गुलमोहर: शांता ज. शेळके | ३ |
| ६ द्वादशी: चि. वि. जोशी | |
| ७ सावरकरांच्या गोष्टी: वि. दा. सावरकर | ४ |
| ८ भेळ: य. गो. जोशी | २ |
| ९ देणें देवाचें: मनमोहन | ३ |
| १० झांकलीं माणकें: दांडेकर | |
| ११ माहेर: अरविंद गोखले | ३ |
| १२ फुलवाली: वि. वा. शिरवाडकर | २ |
| १३ कोंकणकथा: रहाळकर | |
| १४ विखुरलेलें मोतीं: सौ. शांता माडखोलकर | २ |
| १५ दिवाळसण: वि. वि. बोकील | २ |
| १६ लपलेला ओघ: ग. दि. माडगूळकर | २। |
| १७ मोरपिसें: अनंत काणेकर | २। |
| १८ पहिलें चुंबन: ग. ल. ठोकळ | ३ |
| १९ मिठी: ना. सी. फडके | |

## ★ छापत आहेत ★

१ मुलांचा गुंड्याभाऊ

—चिं. वि. जोशी

२ (दहा विनोदी गोष्टी)

—वि. वि. बोकील

३ आडगांवचे चौधरी

—बी. रघुनाथ

४ जोगिया

—ग. दि. माडगूळकर

५ हिशोब चुकता

—सौ. कमला फडके